मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ३७ वें.

# महाराणा संग्रामसिंह.



[ पांच अंकी नाटक. ]

आंग्ल कादंबरीकार सर वाल्टर स्कॉट यांच्या टॅलिस्मन ग्रंथाधारें

**प. वा. श्रीयुत काशीनाथ नारायण पटवर्धन,**

यानीं लिहिलें.





[ प्रथमावृत्ति. ]

---

**मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी.**

गिरगांव, मुंबई.

---

किंमत ०-८-०.] सर्व हक्क स्वाधीन. [जानेवारी १९०९.

---

Printed by G. N. Kulkarni at his KARNATAK PRESS,
7, Girgaon Back Road, Bombay, for the Publishers.

## पात्रें.

| | |
|---|---|
| संग्रामसिंह ... ... ... | ... मेवाडचा महाराणा. |
| बाबरशहा ... ... ... | ... दिल्लीचा बादशहा. |
| करणसिंग ... ... ... | ... छद्मवेषधारी एक रजपूत सरदार. |
| अमीर ... ... ... | ... छद्मवेषधारी एक मुसलमान सरदार. |
| वल्लभाचार्य ... ... | ... व्रजभूमींतील एक साधु. |
| हकीम ... ... ... | ... एक मुसलमान वैद्य. |
| भीमसिंह ... ... ... | ... प्रतापगडचा राजपुत्र. |
| गजसिंह ... ... ... | ... जयपूरचा राणा. |
| मेघसिंह ... ... ... | ... मारवाडचा राणा. |
| जैतसिंग ... ... ... | ... कुरावडचा राणा. |
| राजा सिलौदी तुवर ... | ... रायसीनचा राणा. |
| उदयसिंह ... .... ... | ... राजपुतान्यांतील राऊळ. |
| जवानसिंग ... ... ... | ... संग्रामसिंहाचा विश्वासू संरक्षक. |
| हनुमानसिंग ... ... ... | ... गजसिंहाचा मानकरी. |
| पुरोहित ... ... ... | ... संग्रामसिंहाचा कुलगुरु. |
| कर्णावती ... ... ... | ... संग्रामसिंहाची राणी. |
| कमलावती ... ... ... | ... संग्रामसिंहाची बहीण. |
| रामप्यारी ... ... ... | ... कर्णावतीची दासी. |
| चंपा, जवाहीर } ... ... ... | ... कमलावतीच्या दासी. |
| वेताळ्या, सटवाई } ... ... ... | ... एक विनोदी जोडपें. |

शिवाय शिपाई, चोपदार, खासदार, गप्पीदास, विदूषक, भाट पहारेकरी, मांग, सिद्दी, अंलगुजवाला, दासी वगैरे.



प. वा. श्रीयुत काशीनाथ नारायण पटवर्धन.

# प्रस्तावना.

या नाटकाचे कर्ते, परलोकवासी श्रीयुत काशीनाथ नारायण पटवर्धन यांची ओळख महाराष्ट्र वाचकांस नव्यानें करून द्यावयास पाहिजे असें नाहीं. मनोरंजनांत प्रसिद्ध झालेल्या 'नाटक्याचे तारे,' व 'विनोदलहरि' या दोन मालिकांतील श्रीयुत पटवर्धन यांच्या लेखांनीं त्यांच्या लेखनकौशल्याची, व नोव्हेंबर १९०८ च्या मनोरंजनाच्या अंकांत आलेल्या त्यांच्या मृत्युलेखानें त्यांच्या त्रोटक चरित्राची, यापूर्वींच वाचकांस बरीच ओळख झाली आहे. श्रीयुत पटवर्धन यांच्या आजपर्यंत मनोरंजनांत प्रसिद्ध झालेल्या लेखांनीं त्यांच्या लेखनाची विनोदात्मक बाजूच वाचकांच्या दृष्टीस पडली आहे. प्रस्तुत नाटकानें त्यांच्या लेखनकौशल्याच्या दुसऱ्या अनेक अंगांचा वाचकांस परिचय होईल. बाजूस श्रीयुत पटवर्धनांची प्रतिकृति दिली आहे, तीवरून त्यांच्या पाणीदार व बुद्धिमत्वदर्शक चेहेऱ्याचीहि वाचकांस ओळख होईल.

ज्याच्या हातून ग्रंथ लिहिला जातो, त्याच्यांच हातून त्याचें हृद्गत दर्शविणारी प्रस्तावनाहि लिहिली जावी, हें उचित आहे व आजपर्यंत हा संप्रदाय बहुतेक ग्रंथकर्त्यांकडून साहजिकपणें पाळला गेला आहे; परंतु या नियमास दोन तऱ्हेचे मानवी व दैवी अपवाद आढळण्यांत येतातः—( १ ) कांहीं ग्रंथकार आपली ओळख वाचकवृंदास चांगली व लवकर पटावी ह्मणून एखाद्या प्रसिद्ध ग्रंथकाराकडून आपल्या ग्रंथास प्रस्तावना लिहवून घेतात. हा प्रघात यूरोपांत बराच आहे. किंवा (२) एखाद्या ग्रंथकाराचा ग्रंथ छापून पुरा होण्यापूर्वींच त्याच्यावर निघृण काळाची उडी पडून त्याच्या हृद्गताचा थोडाबहुत परिचय असलेल्या त्याच्या एखाद्या सुहृदास त्या ग्रंथाची प्रस्तावना लिहिण्याचा कधींकधीं दुर्दैवानें प्रसंग येतो. प्रस्तुत प्रसंगीं या नाटकाची प्रस्तावना लिहिण्याचें काम मला करावें लागत आहे, याला कारण वर सांगितलेला दुसरा अपवादच होय. श्रीयुत पटवर्धन गेल्या आक्टोबर महिन्याच्या २२ व्या तारखेस खामगांव (वऱ्हाड) मुक्कामीं प्लेगनें निवर्तले. त्याच्या अगोदर बरेच दिवस प्रस्तुत नाटक छापावयास सुरुवात झाली होती. ईश्वरकृपेनें लेखक आपलें नाटक समग्र छापलेलें पहाण्यास जगले असते, तर वाचकांस त्यांच्या हातची सुंदर प्रस्तावना वाचावयास मिळाली असती. श्रीयुत पटवर्धन

आपलें नाटक रसिकांच्या सेवेस प्रसिद्ध झालेलें पहाण्यास जगले नाहींत ही अत्यंत दुःखाची गोष्ट होय. भवितव्यापुढें इलाज नाहीं. असो. त्यांनीं लिहून ठेविलेल्या कित्येक टिप्पणांच्या आधारें ही प्रस्तावना लिहिली आहे.

प्रस्तुत नाटक प्रसिद्ध आंग्ल ऐतिहासिक कादंबरीकार सर वॉल्टर स्कॉट याच्या 'टॅलिस्मन्' नांवाच्या अत्युत्तम कादंबरीच्या आधारानें लिहिलें आहे. या कादंबरींत इंग्लंडच्या इतिहासांतील क्रूसेड (धर्मयुद्धें) संबंधाचा भाग फारच चटकदार रीतीनें गुंफिला आहे. इंग्लंडचा राजा पहिला रिचर्ड हा या कादंबरीचा नायक होय. रिचर्डला त्याच्या अंगच्या प्रचंड बल, असामान्य शौर्य, विलक्षण औदार्य इत्यादि अमूल्य गुणांवरून क्यूर डि लायन (नरकेसरि) असें अन्वर्थक नांव पडलें होतें. जीजस ख्राइस्टची पवित्र जन्मभूमि पॅलेस्टाईन ही इ. स. च्या बाराव्या शतकांत मुसलमानांच्या ताब्यांत गेली. अर्थात्, त्या काळच्या धर्मसमजुतींमुळें पॅलेस्टाइनच्या ख्रिस्ती यात्रेकरूंचा तुर्कांकडून साहजिकच अत्यंत छल होत असे. आपल्या धर्मबांधवांच्या छलाचें निवारण व्हावें म्हणून यूरोपांतील सर्व ख्रिस्ती राष्ट्रांनीं रिचर्डला आपलें प्रमुखत्व देऊन एकजुटीनें पॅलेस्टाइनवर चाल केली. त्या वेळचा तुर्कांचा बादशहा सलाउद्दिन हा रिचर्डला सर्व प्रकारें योग्य असाच शत्रु होता. कांहीं प्रसंगीं तर शौर्यांत व मुत्सद्दीपणांत त्यानें रिचर्डवरहि ताण केली आहे. तुर्क व ख्रिश्चन यांच्यामध्यें बरींच युद्धें झाल्यानंतर शेवटीं रिचर्डच्या इच्छेप्रमाणें दोन्ही पक्षांत तह होऊन युरोपियन राजे आपापल्या देशीं परतले.

या कथानकाशीं तंतोतंत जुळणारा असा एक प्रसंग राजस्थानच्या इतिहासांतहि आढळतो. इ. स. च्या १६ व्या शतकांत **व्रजभूमि** (गोकुळ) ही यवनांच्या सत्तेखालीं असतां त्या प्रदेशांतील गोवर्धन पर्वतावर श्रीगोवर्धननाथाची मूर्ति वल्लभीपंथाचे मूळ प्रवर्तक वल्लभाचार्य यांनां जमिनींत पुरलेली सांपडली व त्यांनीं या स्मरणीय प्रसंगास अनुलक्षून तेथें महोत्सव सुरू केला. यवनाधिपतीस ही गोष्ट सहन न होऊन तें देवस्थान मोडून टाकण्यास त्यानें हुकूम सोडले; परंतु वल्लभाचार्य असामान्य धैर्याचे होते. राजस्थानच्या वीरांस गोवर्धनमूर्तीच्या संरक्षणार्थ त्यांनीं हांक मारतांच हजारों रजपूत वीर समशेरी उपसून युद्धास तयार झाले. दोन्हीं पक्षांत बऱ्याच मोठया लढाया झाल्यावर आचार्यांनीं गोवर्धनपर्वतावरून ती मूर्ति काढून उदेपुराजवळच्या खोऱ्यांत तिची स्थापना केली. वल्लभीपंथाचें नाथद्वारा म्हणून जें महस्थान आहे, तें हेंच होय.

मेवाडचा वीरप्रवर प्रतापी महाराणा संग्रामसिंह (संग) व त्याचा प्रसिद्ध शत्रु बाबरशहा हे वल्लभाचार्यांशीं समकालीनच होते. हे तिघेहि इ. स. १५३०–३१ च्या दरम्यानच परलोकवासी झाले. वरील धर्मयुद्धें यापूर्वीं नुक्तींच झालीं होतीं. या युद्धांत संगराणा व बाबर हेच आपापल्या पक्षाचे नायक होते–असें नाटकाचे सोईसाठीं तरी मानावयास हरकत नसावी. टॅलिस्मन्‌मधील रिचर्ड व सलाउद्दिन यांच्याशीं सर्वतोपरी साम्य असणारी संग व बाबरासारखी दुसरी जोडी हिंदुस्थानच्या इतिहासांत आढळणें अशक्य आहे.

या तीन पात्रांशिवाय प्रस्तुत नाटकांतील आणखीहि एकदोन पात्रांविषयीं उल्लेख करणें जरूर आहे. संग्रामसिंहाची राज्ञी कर्णावती ही रीचर्डची पत्नी बेरेंगारिया हिची सर्वतोपरी बहीण शोभण्यासारखी आहे. रायसीनचा राजा सिलैदी तुवर हा रिचर्डविरुद्ध भयंकर कट करणारा ग्रँड मास्टर ऑफ धि टेंप्लर्स याचा सहोदरच आहे. फत्तेपुर शिक्रीच्या लढाईत संगाशीं दगा करून याच निमक-हरामानें बाबरला हिंदूंच्या गोटांत प्रवेश करण्याचा रस्ता दाखवून त्याला कायमचा आंत घेतला.

राणा संग्रामसिंहाच्या शौर्याबद्दल वर उल्लेख आलाच आहे. त्याचा सर्व जन्म युद्धें करण्यांत गेला. एकंदर अठरा निकराच्या लढायांत संगानें तुर्कांचा पराभव केला. त्याच्या शरीरावर भाल्याच्या व तरवारीच्या मिळून एकंदर ऐंशीं जखमा होत्या. शौर्यांत व मर्दुमकींत राणा संग असामान्य प्रतीचा वीर असून रिचर्डपेक्षांहि या गुणांत श्रेष्ठ होता, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. वीरश्रेष्ठ बाबरहि सलाउद्दीनची सर्वतोपरी बरोबरी करणारा होता. बाबर व संग हे जर एकमेकांचे शत्रु नसते तर ते जगाच्या मान्यतेस पूर्णपणें उतरले नसते, हें खास आहे.

'टॅलिस्मन' ला हिंदी पोषाख चढविण्यांत श्रीयुत पटवर्धनांनीं फार कौशल्य दाखविलें आहे यांत शंका नाहीं. सूक्ष्म दृष्टीच्या वाचकांस या नाटकांत थोडीबहुत इंग्रजीची झांक, आणि वस्तुस्थितीचा व कालाचा विपर्यासहि कदाचित् आढळून येईल. परंतु हे दोष बहुतेक अपरिहार्यच आहेत.

आजपर्यंत मराठींत झालेल्या ऐतिहासिक नाटकांत व यांत एक विशेष फरक वाचकांस आढळून येईल. इतर नाटककारांप्रमाणें फाजील अंधपक्षाभिमान धरून श्रीयुत पटवर्धन यांनीं आपण हिंदू ह्मणून या नाटकांत हिंदूंस मुसलमानांच्या छातीवर बसविलें नाहीं! या पक्षाभिमानास वश झाल्यामुळें पुष्कळ ऐतिहासिक नाटक-कारांनीं मोठे प्रमाद केले आहेत. मुसलमान लोक हिंदूंचे पुरातन कालापासून शत्रू

असल्यामुळें हिंदुस्थानच्या इतिहासांत त्यांची व आमची सांगड जमली आहे; इतकेंच नव्हे, तर ते लोक आपणापेक्षां शूर व पराक्रमी होते या गोष्टीची त्यांनीं आपणांवर अनेक शतकें गाजविलेली अमर्याद सत्ताच साक्ष देत आहे. आतां हें निर्विवाद आहे, कीं, शिवाजी महाराजांसारखे कांहीं महापराक्रमी पुरुष या आर्यभूमींत अवतरून त्यांनीं मुसलमानांच्या सत्तेला बराच आळा घातला. पण एवढ्यामुळें प्रत्येक ऐतिहासिक नाटकांत मुसलमानांवर हिंदूंचेंच वर्चस्व दाखविणें, हा केवळ अंधपक्षाभिमान होय. बाजी देशपांड्यांच्या मोलकरणी मुसळें व जात्यांचे खुंटे घेऊन ज्या यवनांस पिटाळून लावतात त्याच यवनांस भिऊन खुद्द शिवाजीमहाराज रांगण्या किल्ल्यावरून पोबारा करितात, हें कसें संभवतें? सद्यःस्थितीचा विचार करितां पक्षाभिमान वाढविण्यापेक्षां तो नाहींसा करण्यांत देशाचा फार फायदा आहे. या सुज्ञ धोरणास अनुसरूनच श्रीयुत पटवर्धनांनीं हें नाटक लिहिलें आहे, याबद्दल त्यांची स्तुति करावी तेवढी थोडी आहे.

या नाटकांत मुसलमानी पात्र एकच आहे तें बाबर हें होय. त्याच्या तोंडीं मराठी भाषा घातलेली पाहून कांहीं वाचक व प्रेक्षक नाक मुरडतील; परंतु हा त्यांच्या गतानुगतिक दृष्टीचा दोष आहे, असेंच ह्मटलें पाहिजे. मराठी भाषेंतील नाटकांत मुसलमानानें जर उर्दूंत भाषण केलें पाहिजे, तर रजपूतांनीं तरी अस्सल पुणेरी भाषेंत कां ह्मणून बोलावें? आपणांपेक्षां शतपटीनें सुधारलेल्या इंग्रजांनां लुगडें नेसलेली शकुंतला इंग्रजींत बोलून तल्लीन करित नाहीं काय? केवळ नांवें व पोषाख बदलल्यानें आमची मल्लिका (Opelia) वीस बावीस वर्षेंपर्यंत अविवाहित राहूं शकते आणि शशिकला (Juliet) रत्नपालाला (Romio) लग्नापूर्वींच खुशाल एकांतांत भेटते अशासारख्या विसंगत गोष्टींनां अनुमोदन देणाऱ्या वाचकांनीं मराठी नाटकांतील मुसलमान पात्रांनां रजपुतांसारखीच मराठी भाषा बोलावयास हरकत करावी हें मोठें आश्चर्य आहे. नाट्यकलेच्या सुधारणेसाठीं 'नाटक्याच्या ताऱ्यां' सारखे लेख लिहिणाऱ्या पटवर्धनांनीं आपल्या नाटकांत हा सुधारणा करण्यासारखा प्रसंग दवडिला नाहीं, हें पाहून सुधारणाप्रिय रसिक वाचकांस आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं.

एखाद्या पितृहीन अनाथ बालकाकडे सहृदय लोक ज्या दयापूर्ण दृष्टीनें पहातात, त्याच दृष्टीनें वाचकांनीं माझ्या परलोकगत मित्राच्या या पोरक्या नाटकाकडे पहावें अशी त्यांनां नम्रपणें विनंति करून त्यांची रजा घेतों.

मुंबई,
१५ जानेवारी, १९०९.

**विठ्ठल सीताराम गुर्जर.**

# महाराणा संग्रामसिंह.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

[ **स्थळ**—एका सरोवराच्या कांठचा प्रदेश. करणसिंग स्वतःशींच बोलत आहे, असा प्रवेश. ]

**करणसिंग**— हर हर! कोण निराशा ही! मृगजलाचा साक्षात्कार आज पूर्णपणें प्रत्यक्ष अनुभवास आला! प्रातःकालपासून हा वेळ पर्यंत या रुक्ष व निर्जन प्रदेशांत प्रवास करून सर्व अवयव थकून गेले; अशा समयीं ह्या समोरच्या विस्तीर्ण व प्रशांत सरोवराचे सान्निध्यानें प्रवाशाला केवढा आनंद व्हावा! परंतु वस्तुस्थिति किती उलट आहे पहा! बाह्यांग सुंदर अशा कांहीं प्रकृतीचीं अंतरंगें कशीं कृष्णवर्ण असतात, याचा मनुष्यजातीला एक प्रकारें अनुभव दाखविण्यासाठींच जणूं काय विधात्यानें या सरोवराला निर्माण केलें आहे! तृषार्तानें मोठ्या आतुरतेनें याच्याजवळ जावें, व क्षारयुक्त आणि विषारी उदकाचा एकच घोंट घेतल्याबरोबर पंचप्राण कासावीस होऊन खिन्न वदनानें त्यानें तत्काळ परत फिरावें, हा प्रकार त्या मृगजलाहूनहि जास्त उद्वेगजनक नाहीं काय? ( उद्वेगानें ) आह्मां रजपूत वीरांनां आजच्या घटकेला निराशेनें सर्वच बाजूंनीं घेरलें आहे, तेव्हां येथें तरी ती आमची पाठ कशी सोडील? कडव्या तुर्कांनीं परम पवित्र व्रजभूमींतील देवालयें भ्रष्ट केलीं, यात्रेकरूंचा छल मांडिला, असंख्य गोमातांचा संहार करून रक्ताच्या नद्या वाहविल्या, व महान् भक्त वल्लभाचार्य साधूनें श्रीगोवर्धननाथजींचा उत्सव सुरू केला असतां त्यांत अनेक विघ्नें आणिलीं, यासंबंधाच्या हृदयद्रावक बातम्या राजस्थानांत संचार करूं लागल्याबरोबर तेजस्वी रजपूत पठ्ठयांच्या अंगांतील रक्त तापून गेलें व 'सूड' 'सूड', अशी प्रचंड गर्जना करित, महाराणा संग्रामसिंहाच्या निशाणाखालीं

राजस्थानचे यच्चावत् रजवाडे आपापल्या फौजफांट्यासह धर्मयुद्धार्थ जमा झाले. कांहीं कालपर्यंत मोहीम खूप जोरानें चालली होती, व तो जोर जर आणखी थोडे दिवस टिकता, तर आजामितीस व्रजभूमीची मुक्तता होऊन रजपुतांचे पराक्रमाचा यशोदुंदुभी त्रिभुवनांत दुमदुमून राहिला असता. परंतु त्या ऐवजीं आतां निराशेची लांछनास्पद स्पष्ट व गाढ छाया मात्र सर्वत्र पसरूं लागली आहे. संग्रामसिंहाचा तापट, मानी व लहरी स्वभाव, त्या योगानें उत्पन्न होणारे राजमंडळांतील नानाविध बखेडे, लहानसहान मांडलिकांचा फंदफितुर, सैन्यांत वाढत चाललेला असंतोष, त्यामुळें शत्रूला मिळणारा जोर–आणि तो शत्रूहि असा तसा नव्हे,–प्रत्यक्ष खोरासानचा बाबरशहा–ह्या गोष्टी कशाच्या द्योतक आहेत? (थांबून) इतक्यांचाहि प्रतिकार झाला असता; परंतु हल्लीं या प्रांतांत उद्भवलेल्या दुष्ट सांथीनें आपला प्रभाव आमच्यावर गाजविणें सुरू केलें. प्रत्यक्ष राणा संग्रामसिंह, ज्याच्या जिवावर मोहिमेची सर्व मदार, तोहि आज पंधरा दिवस बिछान्याला खिळून राहिला आहे. आणि त्यामुळें राजमंडळांतील स्वार्थसाधू नेभळ्या राजांनीं शत्रूबरोबर एकदम तह करण्याचा घाट घातला आहे. धिक्कार असो यांनां आणि यांच्या कर्तबगारीला!! (इकडे तिकडे फिरून) त्यांतल्या त्यांत समाधानाला जागा एवढीच कीं, संग्रामसिंहाची प्रकृति अद्यापपर्यंत ठीक आहे. ईशकृपेनें त्या सिंहाला थोडा आराम वाटला पुरे, कीं, पहिल्याच गर्जनेबरोबर तो सर्व सैन्यांत चेतना उत्पन्न करील आणि या नामर्द राजमंडळाचीं सर्व कारस्थानें लाथेखालीं तुडवून टाकील. (थांबून) बरें, या तहाचे संबंधांत मध्यस्थी करणारा तरी कोण, तर या धर्मयुद्धाचा आदिपुरुष मानला जाणारा जो वल्लभाचार्य तो! व त्याच्याकडेच खलित्यासह राजमंडळाकडून माझी रवानगी झाली आहे! हा काय प्रकार असावा हें मला नीटसें समजत नाहीं. असो. तूर्त आपल्या कामगिरीकडेच नजर द्यावी. मला दिलेल्या माहितीवरून तो साधू येथेंच आसपासच्या डोंगरांत रहात असावा. (न्याहाळून) अरे हा इतक्या त्वरेनें इकडे कोण बरें येत आहे? हा कोणी तुर्क दिसतो. याचा रोंख कांहीं निराळाच आहे. आपणहि तयार असावें. पहा हा आलाच!

(एक अमीर प्रवेश करितो.)

**अमीर**—(करणसिंगास) तूं कोण आहेसरे? कोणीकडे चाललास, बोल?

**करणसिंग**—हा प्रश्न विचारण्याची तुला जरूर नाहीं. तूं आपल्या वाटेनें जा!

**अमीर**—तुझीं मगरुरीचीं भाषणें ऐकून घेणारा हा प्राणी नाहीं, समजलास! माझ्या सवालाचा जबाब तुला दिलाच पाहिजे. महान् प्रतापी बाबरशहाचे ताब्यांतील हा प्रांत आहे, आणि याची रखवालदारी मजकडे आहे. येथून कोणीं जावें, व कोणीं जाऊं नये, हें माझ्या खुशीवर अवलंबून आहे.

**करणसिंग**—विनाकारण कांहींतरी कुरापत काढून आपला जीव धोक्यांत घालूं नकोस! आह्मां रजपुतांनां तूं नीट ओळखित नाहींससें दिसतें? चल, हो बाजूला!

**अमीर**—बस्स, होऊंद्याच तर मग तुमचे आमचे दोन हात! ( पवित्र्यांत उभा रहातो. )

**करणसिंग**—ठीक आहे, चालू असलेल्या यवनसत्रांत एक जास्त आहुति पडून तितकें जास्त पुण्य माझ्या पदरीं पडेल!

( दोघे लढतात. कोणीहि हरत नाहीं. दोघे तटस्थ उभे रहातात. )

**अमीर**—( स्वगत ) फिटला माझा संशय! ज्याची करामत आणि शौर्य पाहून मी कित्येक प्रसंगीं चकित झालों आहें तोच हा जवानमर्द! रजपुतसैन्यांत संग्रामसिंहाचे तोडीचा हा एकच योद्धा आहे. महाराणा ज्याप्रमाणें माझा खरा शत्रु व खरा दोस्त आहे, तसाच हाहि माझ्या दोस्तीला लायक आहे. ( उघड ) रजपुता! तूं कोणीहि ऐस, ज्या अर्थी द्वंद्वांत तूं माझी बरोबरी केलीस, त्या अर्थी तूं व मी आजपासून दोस्त होऊन धर्मभेद मनांत न आणितां परस्परांच्या सुखदु:खाचे वांटेकरी होऊं.

**करणसिंग**—ठीक आहे, आमचेकडून कबुली. परंतु आपण आपला शब्द राखाल, याची खात्री कशावरून?

**अमीर**—खरा महंमदी मनुष्य आपली जबान कधींतरी सोडील काय? शिवाय, शूर पुरुष खोटें बोलतो, ही गोष्ट आज आपल्या मुखानेंच प्रथम ऐकतों! ह्मणून आपणच आपली खात्री अगोदर द्यावी.

**करणसिंग**—( खजील होऊन ) खरोखर, अशी शंका घेणें शूराला योग्य नाहीं. या खड्गाची शपथ—आजपासून आपण खाजगी व्यवहारांत परस्परांचे स्नेही झालों.

**अमीर**—चालू धर्मयुद्धांत जरी आपण एकमेकांचे दुष्मन् आहों, तरी मी अल्लाची शपथ घेऊन सांगतों कीं, इतर सर्व व्यवहारांत मी आजपासून आपला अत्यंत जिवलग दोस्त आहें. आतां आपली कोठें जाण्याची इच्छा आहे? बरीच संध्याकाळ झाली आहे, आणि हा प्रदेशहि असावा तितका निर्भय नाहीं. तेव्हां

माझ्या मदतीचा कांहीं उपयोग होण्यासारखा असल्यास कसलीच शंका मनांत न आणितां आज्ञा करावी.

**करणसिंग**—वल्लभाचार्य नांवाचा एक साधुपुरुष या प्रदेशांत रहात असतो, त्याची भेट घेण्याची माझी इच्छा आहे.

**अमीर**—वाहवा, फार उत्तम! मलाहि तिकडेच जावयाचें आहे. त्या साधूशीं माझा फार परिचय आहे. चला, आपण दोघे बरोबरच जाऊं. पण दोस्त ! एक विनंति आहे. आजचा हा अपूर्व स्नेहसंबंध ज्या वीराशीं घडून आला आहे, व ज्याच्या शौर्याची व सद्गुणांची ख्याति सर्व राजस्थानभर पसरली आहे, त्याचें नांव मला कळेल का ?

**करणसिंग**—( स्वगत ) मी खरा कोण, हें सर्व रजपूतसैन्यांत कोणालाहि माहीत नाहीं. यालाहि तें तूर्त सांगूं नये. ( उघड ) अमीरसाहेब, या मोहिमेंत मी करणसिंग या नांवानें प्रसिद्ध आहें.

**अमीर**—कसें ह्मणालां ? या मोहिमेंत आपण करणसिंग या नांवानें प्रसिद्ध आहां ? यावरून आपलें खरें नांव व दर्जा हीं हल्लींहून भिन्न असलीं पाहिजेत ! ( स्वगत ) वल्लभाचार्यांनें काल जी एक गुप्त कामगिरी मला सांगितली, ती निःसंशय याच इसमाबद्दल.

**करणसिंग**—अमीरसाहेब ! आपलें नांव व थोर कुल समजून घेण्याची मलाहि परवानगी असावी.

**अमीर**—शहानशहा बाबरशहाचे पदरचा मी एक साधारण प्रतीचा सरदार आहें. इकडील प्रदेशांत मला शेरकोह ( पहाडी वाघ ) ह्मणतात. माझा जन्म खुद्द बाबरशहाच्या कुळांतच झाला आहे.

**करणसिंग**—आपण मोठे भाग्यवान् आहां. आपला लवाजमाहि तसाच फार मोठा असेल ?

**अमीर**—असेंच केवळ नाहीं ! तरीपण आपल्याकडील एखाद्या उच्च प्रतीच्या सरदाराहून माझी स्थिति निःसंशय बरी आहे. करणसिंग ! आपण या स्वारींत आलांत ते किती मनुष्यांनिशीं ?

**करणसिंग**—काय सांगूं ! मी या मोहिमींत सामील झालों त्या वेळीं बरोबर कमींत कमी पन्नास इसम आणिले होते; परंतु त्यांतील कांहीं परत देशीं गेले, कांहीं लढाईंत कामीं आले, व आतां या घटकेला मजपाशीं फक्त एकच इसम शिल्लक राहिला आहे; पण तोहि अलीकडे उद्भवलेल्या ह्या वाईट हवेच्या तापानें आजारी पडला आहे.

**अमीर**—मी असें ऐकतों कीं, तुमचा महाराणाहि ह्मणे याच तापानें आजारी आहे ?

**करणसिंग**—होय, सर्व रजपुतांनां मोठी काळजी लागली आहे. महाराण्यांनां औषधोपचारहि लागू पडत नाहीं.

**अमीर**—अफसोस ! असल्या क्षुल्लक रोगावर दवा देण्याला योग्य हकीम खुद्द तुमचे महाराण्यांजवळहि नसावा ! ( थांबून ) हो, बरी आठवण झाली; आमच्या बादशहाचे दरबारांत एक नामांकित वैद्य आहे व असल्या ज्वरावर त्याच्या औषधाचा गुण इतका जलद येतो कीं, तें औषध केवळ अमृतच आहे अशी ख्याति आहे. दोस्त, शहाजवळ मी आपलें वजन खर्च करून तो प्रख्यात हकीम एकदोन दिवसांत तुमच्या छावणींत पाठविण्याची तजवीज करितों. बाबरशहाच्या मनाचा थोरपणा तुमचा राणा ओळखून आहेच. अर्थात् संशयाचें कारण राहण्यार नाहीं अशी मला उमेद आहे.

**करणसिंग**—आपले फार उपकार होतील. प्रत्यक्ष महाराणाजी ही गोष्ट कबूल करतीलच असें जरी मला खात्रीनें सांगतां येत नाहीं, तरी निदान माझ्या खासदाराला व सैन्यांतील आणखी पुष्कळ लोकांनां जीवदान दिल्याचें तुह्माला श्रेय मिळेल.

**अमीर**—ठीक आहे. चला, ती पहा वल्लभाचार्यांची गुहा. ( दोघे हातांत हात घालतात. ) दोस्त ! आपण आजची रात्र येथेंच आराम करूं !

[ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ **स्थळ**—वल्लभाचार्यांची गुहा. ]

**वल्लभाचार्य**—( प्रवेश करून ) जगदीशा गोपालकृष्णा ! तूं आज मजवर केवढें जबाबदारीचें काम सोंपविलें आहेस ? सर्वसंगपरित्याग करून तुझ्या भजनांत कालक्रमण करणाऱ्या मजसारख्या क्षुद्र प्राण्यावर ह्या चालू धर्मयुद्धाची सर्व जोखीम ठेवणें, ह्मणजे तुझी योजना धन्य आहे, असें ह्मणून स्वस्थ राहणें भाग पडतें. हें जगत् ह्मणजे कळसूत्री बाहुल्यांचा खेळ. त्या बाहुल्यांच्या कृति योग्य प्रकारें घडून येणें केवळ तुझ्या इच्छेवर अवलंबून आहे. विधर्मी

तुर्कांनीं परम पवित्र व्रजभूमींत देवस्थानांचा, गोब्राह्मणांचा व साधुसंतांचा जो छल मांडिला आहे, त्याचा प्रतिकार करण्यासाठीं हिंदु धर्माचे खरे अभिमानी जे राजस्थानचे शूर राणे, त्यांमध्यें धर्मयुद्धाची स्फूर्ति उत्पन्न करून त्यांनां मीं येथें आणिलें. आजमितीस मोहीम बरीच रंगांत आली आहे; परंतु अलीकडे राजमंडळाचीं जीं कारस्थानें चालू आहेत, त्यामुळें तो रंग पालटण्याची धास्ती वाटूं लागली आहे. वास्तविक पहातां तुर्कांचा हल्लींचा बादशहा बाबर अत्यंत नीतिमान् व विचारी आहे; परंतु त्याच्या हाताखालचे अम्मलदार पडले जुन्या अमदानींतले, अत्यंत जुलमी, अविचारी, हेकेखोर व हिंदूंचे कट्टे दुस्मान. शिवाय बाबरशहाला इकडील लोकस्थिति माहीत नसल्यामुळें आरंभीं या अम्मलदारांवर फाजील भरंवसा ठेवणें त्याला भाग पडलें. त्यामुळें 'पिशाचाच्या हातीं कोलीत' अशी अवस्था होऊन त्यांचा 'दीन' सर्वत्र हाहाःकार उडवूं लागला. एकंदरींत राजा किती जरी सद्गुणी असला, प्रजेच्या कल्याणाची व तद्द्वारा देशकल्याणाची त्याला कितीहि कळकळ असली, तरी जोंपर्यंत मंत्रीमंडळाच्या स्वैर वर्तनाला तो आळा घालणार नाहीं, तोंपर्यंत त्याचे सर्व हेतु निष्फळच होतील. इतकेंच नाहीं, तर त्याच्या अधिकाराचा पोंचटपणा सर्व राष्ट्राला विघातक होईल. ह्याच बाबरशहानें प्रथमारंभीं थोडी दूरदृष्टि पोहोंचवून देशस्थितीचा विचार केला असता, हिंदू ह्मणजे केवळ रानटी लोक आहेत असें सांगणाराचे जिभेला चिमटा घेतला असता, व हिंदु धर्माच्या ठायींहि कांहीं प्रखर तेज असून त्या धर्मासाठीं मुसल्मानांप्रमाणेंच—किंबहुना त्यांच्याहूनहि जास्त त्वेषानें लढणारे लोक हिंदुस्थानांत आहेत, एवढ्या गोष्टी जरी त्यानें ध्यानांत आणिल्या असत्या, तरी हल्लींसारखी स्वतःच्या इच्छेविरुद्ध लढाई चालवून असंख्यात प्राणहानीचें पातक शिरावर घेण्याचा प्रसंग त्याला कधींहि येता ना. इकडे रजपूतांचाहि प्रकार विलक्षण! राणा संग्रामसिंह जरी महान् प्रतापी आहे, तरी त्याची महत्त्वाकांक्षाहि जबर आहे. तिच्या भरांत तो वाटेल त्याची मानहानि करितो. त्यामुळें इतर सर्व रजवाडे त्याच्या अधिकाराला नाराज होऊन त्यांपैकीं कांहीं प्रत्यक्ष शत्रूला आंतून सामील झाले आहेत. ह्या संबंधांत राण्याला दोन उपदेशाच्या गोष्टी सांगण्याचा माझा विचार आहे; परंतु आज तागायत त्याची व माझी भेट देखील नाहीं. इतकेंच नाहीं, तर मजबद्दल त्याचा अत्यंत गैरसमज झाल्याचेंहि माझ्या कानीं आलें आहे. साहजिकच आहे. तरवारीवरच ज्याचा सर्व भरंवसा, तो मजसारख्या बैराग्याच्या मसलतीला कसा मानील? असो. आपल्या हातून होईल ती खटपट

आपण करावी, फलदाता परमात्मा समर्थ आहे. (न्याहाळून) पलीकडच्या कोठडींत निजलेले हे दोन चमत्कारिक पाहुणे आज माझ्याकडे एकाच वेळीं आले आहेत. यांचा एकमेकांशीं बराच स्नेह दिसतो; परंतु एवढी खात्री आहे कीं, तो तुर्क वास्तविक कोण पुरुष आहे हें या रजपुताला माहीत नाहीं. माझ्या अल्प पाहुणचाराचा स्वीकार करून ह्या दोघांनां गाढ निद्रा लागली आहे. तो रजपूत मजकडे कांहीं विशेष कारणासाठीं आला असला पाहिजे. यासाठीं आतां त्याला थोडा वेळ जागृत करावें. कोणाचाहि निद्राभंग करणें जरी महत्पाप आहे, तरी प्रसंगाकडे नजर देतां तसें करणें जरूर आहे. (आंत जाऊन करणसिंगास हळूच उठवितो.) बच्चा! सावध हो, गडबड करूं नको. तो पलीकडे निजलेला तुर्क कदाचित जागा होईल. मजपाशीं तुझें कांहीं काम असेल तर ये असा इकडे. (दोघेहि पुढें येतात.) कसें काय, सर्व राजमंडळाचें कुशल आहेना?

**करणसिंग**—होय महाराज! महाराणा संग्रामसिंह खेरीजकरून सर्व कुशल आहेत.

**वल्लभाचार्य**—ह्मणजे! राण्याची प्रकृति अद्याप सुधरली नाहीं?

**करणसिंग**—नाहीं. सर्वांनां मोठी काळजी उत्पन्न झाली आहे. त्यां संबंधांतच आपलें दर्शन घेण्याचा मला हुकूम आहे.

**वल्लभाचार्य**—याशिवाय आणखी कांहीं 'परवल' तुजजवळ त्यांनीं दिला आहे काय?

**करणसिंग**—(स्वगत) कसें करावें, द्यावा कीं नाहीं? द्यावा हेंच ठीक. (उघड) महाराज! राजेलोक साधूंजवळ भिक्षा मागतात—

**वल्लभाचार्य**—पुरे पुरे, तुझी खूण पटली. मात्र खूण विचारली, याबद्दल रागावूं नको. पहा, एखादा पहारेकरी नोकरीवर असतां त्याचे समोरून शत्रु अगर मित्र कोणीहि गेला असतां त्यानें हटकलेंच पाहिजे. तशांत माझा पहारा किती महत्त्वाचा आहे, हें तूं जाणतच आहेस. बरें, सांग तुझें काम.

**करणसिंग**—(एक लखोटा बाहेर काढून) धर्मयुद्धार्थ जमलेल्या राजसमूहानें हा खलिता आपल्या चरणांकडे पाठविला आहे, यावरून सर्व हकीगत ध्यानीं येईल.

**वल्लभाचार्य**—(वाचून) एकंदरींत महाराण्याची प्रकृति बरीच बिघडली असावी असें दिसतें. ईशेच्छेपुढें कोणाचा इलाज आहे? हें पहा, ह्यांत सुचविलेल्या गोष्टींचा पूर्ण विचार करून नंतर याचें उत्तर पाठवूं. तूर्त

राजमंडळाला आमचा एवढाच निरोप कळीव कीं, शहाचा कल आपल्या हेतूंनां अनुरूप असाच वळत आहे व विशेष काळजी करण्याचें आतां कारण राहिलें नाहीं. जा तूं आतां आपल्या ठिकाणीं.

**करणसिंग**—महाराज, परवानगी असेल तर माझी एक नम्र विनंति आहे.

**वल्लभाचार्य**—बोल.

**करणसिंग**—मी ऐकतों कीं, याच ठिकाणीं आपण स्थापन केलेला एक गुप्त मठ असून त्यांत श्रीठाकुरजींचें स्थान प्रेक्षणीय आहे.

**वल्लभाचार्य**—( करणसिंगाकडे रोंखून पाहून ) होय, तूं ह्मणतोस तें स्थान येथेंच आहे व तें तुला दाखविण्याला हरकत दिसत नाहीं. कारण, तूं केवळ सामान्य प्रतीचा शिपाई नसून थोर कुळांत पैदा झालेला रजपूत सरदार दिसतोस. परंतु तेथें जातांना मनांतील सर्व कुतर्क व पापवासना यांनां फांटा दे. तें स्थल अत्यंत पवित्र आहे, व मनांत कुकल्पना ठेवून तेथें जाणारावर भयंकर ईश्वरीक्षोभ होतो. बोल, आहे तुझी तयारी ?

**करणसिंग**—महाराज, मी स्वमुखानेंच काय सांगूं ?

**वल्लभाचार्य**—ठीक आहे. ये माझ्यामागून. त्या ठिकाणीं तुला पोंहोंचवून मी आपल्या नित्यकर्माला लागतों.

[ दोघेहि एका मार्गानें जातात. मंदिराचा देखावा दिसतो.

**करणसिंग**—( प्रवेश करून ) काय हें तेज ! किती देदीप्यमान हा देखावा ! कारागिरी तरी किती अजब आहे ! वल्लभाचार्य महाराज ! आपला महिमा किती ह्मणून वर्णन करावा ! हिंदुज्ञातीवर आपले केवढे उपकार आहेत ! तुर्कांनीं आमचीं सर्व धर्मस्थानें उध्वस्त करण्याचा सपाटा चालविला असतां अशा निर्जन प्रदेशांत, इतक्या बेमालूमपणें, फक्त स्वतःच्या दीर्घ श्रमावर हें व यासारखीं आणखीं अनेक सुंदर स्थानें स्थापन करून त्यांचें रक्षण करणें ही आपली कृति असाधारण आहे ! मी महत् भाग्यवान् ह्मणून मला हा दर्शनाचा अलभ्य लाभ झाला. ( चपापून ) हा सुस्वर आणि मंजुळ गायनरव कोठून बरें येत आहे ! मला वाटतें, मंदिरांतील स्त्रिया श्रीठाकुरजीची नित्य उपासना करण्यासाठीं येत असाव्या. आपण थोडें बाजूला व्हावें.

( गाभाऱ्यामागून कांहीं स्त्रिया व मुली पुढील गाणें गात गात येतात. पुढें दोन मुली, त्यांच्या हातांत पंचारती, त्यांच्यामागें आणखी दोन मुली, त्यांच्या हातांत फुलांची तबकें, व त्यांमागें बुरखा घेतलेल्या आणखी सहा स्त्रिया. प्रदक्षिणा घालतांना एक स्त्री करणसिंगाजवळून जातांना त्याच्या पायावर एक फूल टाकते. )

( **चाल**—श्रीमच्छंकर सुजन शुभंकर० )

**ऐक विनंती या दुहितांची ठाकुरजी देवा !।**
**चुकलिना भक्ति कधिं वा । चरणसेवा. ॥ ध्रु० ॥**
**वेणुप्रिय सद्वंशभवा[1] । गोपाला गोपप्रसवा[2]!।**
**भूपा दे आरामलवा ; ।**
**सर्वौषधिमय गोवर्धनधर तद्व्याधी शमवा. ॥ १ ॥**
**रोगपवन कुलदीपक हा । मालवुं पाहे त्वरित पहा ।**
**रक्षीं या सद्गुणगेहा ।**
**भारतभूसौभाग्यतिलक हा । म्लान न हो बरवा. ॥ २ ॥**

**करणसिंग**—( दचकून ) काय ? याचा अर्थ काय बरें ? हा प्रकार बुद्धिपुरस्सर झाला असावा काय ? माझी प्रियतमा या समूहांत असणें संभवनीय आहे ? संग्रामसिंहाची भगिनी कमलावती, जिनें माझ्या हृदयाचें स्वामित्व हरण केलें, तिचीच ही खूण! ( त्या स्त्रिया पुन्हा जवळून जातात, तेव्हां तीच स्त्री त्याच्या पायांवर आणखी एक फूल टाकिते. ) तीच ! निःसंशय तीच ! ( स्त्रिया जातात व दिवे विझून सर्वत्र अंधार होतो. ) तोच कोमल हात, व त्याला शोभा देणारी तीच रत्नजडित मुद्रिका ! कमलावतीला मोठमोठ्या राजपुत्रांच्या मागण्या येत असून त्यांतील एकहि पसंत झाली नाहीं, हें मला ऐकून माहीत आहे. तसेंच तिची मजवर प्रीति आहे असें मानण्यालाहि आधार नाहीं असें नाहीं. तथापि मी एक साधारण प्रतीचा सरदारच आहें असें जोंपर्यंत ती समजते आहे, तोंपर्यंत आतांसारखें प्रीतिसूचक चिन्ह तिच्याकडून दर्शविण्यांत येईल असें मला वाटलें नव्हतें. परंतु यावेळीं तिनें आपल्या मनाचा दृढ निश्चय स्पष्टपणें व्यक्त केला. कमलावती, तुझ्या प्रेमाची साक्ष देणारीं हीं सुंदर पुष्पें मी आपल्या हृदयांत सांठवून ठेवीन ! ( फुलें घेण्यासाठीं खालीं वांकतो ) अरे ! पण हा काय विलक्षण प्रकार ! तो दिव्य स्त्रीसमूह अदृश्य झाल्याबरोबर येथील प्रकाशहि नाहींसा झाला आं ? वास्तविकच आहे. नभोमंडळांतून चंद्रिकेचा अस्त झाल्याबरोबर, सर्व सृष्टि अंधकारमय झालीच पाहिजे ! ( एक चोरदार उघडून वेताळ्या कंदील घेऊन येतो. कंदील स्वतःचे तोंडासमोर ओवाळतो, व शीळ वाजवतो. ) हें एखादें पिशाच्च तर नाहीं ?

---

१ चांगल्या वंशापासून कुळापासून, पक्षीं वेळूपासून उत्पन्न झालेल्यास.
२ राजांपासून, पक्षीं गवळ्यांपासून जन्म पावलेल्यास.

स्वर्गाप्रमाणें पवित्र अशा ह्या ठिकाणीं ह्यांचा काय संबंध ? ( साशंक ) अथवा यांत कांहीं दगा तर नाहीं ? आपण सावध असावें. ( तरवार सांवरतो. )

**वेताळ्या**—अव कारभारनी ! ये की बिगी बिगी ! माज्यामांग येतिया ह्मून येथोळ कुट जाऊन दडी घेऊन बसलिया ?( शीळ वाजवितो. सटवाई प्रवेश करिते. )

**सटवाई**—कार, असा कां वागावानी वरडत सुटलायास ? कुट पळून ग्येली व्हती व्हय ? माईसाएबांची बटीक माझ्यासंग काइंबी हितगूज ब्वोलत व्हती, आन् त्यापाई मला वाइंच वखत झाला. म्येल्या ! येकल्यान् झाडझूड क्येली असतीस तर हात म्वोडल असत व्हय ?

**करणसिंग**—( स्वगत ) हीं मनुष्यें या मंदिराची झाडझूड करणारीं दिसतात.

**वेताळ्या**—आन् कायग, इक्त हितगूज–आन् तुज्यासंग !

**सटवाई**—आन् तुला कशापाई इक्ती पंचात ! जर मी येयाच्या अदुगर समदं मंदीर अक्षी झाडून लक्क क्येल असत, तर त्येंतला योकानयोक सबूद सांगतला असता.

**वेताळ्या**—व्हायलं–मघां क्येलं न्हाइं–आतां करून टाकतों अक्षी झटपट ! ( झाडूं लागतो. )

**सटवाई**—कसा झाडतोया–कसा झाडतोया ! वाईच हत झाडतो–वाईच थत झाडतो–हत क्येर ठिवतो–थत घान करतो–आन् हकड, बायकूच काम बायकूच करू जान !

**वेताळ्या**—आन् माझ ह्मनन बी त्येंच ! (ती झाडूं लागते.) पन कां ग, आज पुरानीक बावा काय ह्मनत व्हते हाय का ठाव ? क्योना मुलकचा राजा आन् रानी ह्मन्ये लई सुंदार व्हती–अक्षी मैदान आन् रेती ! तुमी आमी तर त्येच्या पून बी सुंदार ! मंग क्योन मैदान आन् क्योन रेती ? तूं मैदान आन् मी रेती, का मी रेती आन् तूं मैदान ?

**सटवाई**—तूंच जा मैदानांत न्हाई तर रेतींत ! बोलन्यांत ग्वोड आन् कामांत दोड !

**करणसिंग**—( स्वगत ) हा मोठा गुलहौशी जोडा दिसतो ! मदन आणि रतीचे मूर्तिमंत अवतार खरे ! यांची कांहीं हकीगत विचारावी. ( उघड ) कायरे, तुह्मी कोण आहां ?

**सटवाई**—हा क्योनरे ?

**वेताळ्या**—क्वोन हाइसर तूं ? ( कंदील वर करून त्याचे व आपलेभोंवतीं ओंवाळतो. )

**करणसिंग**—तुह्मी कोण आहां, बोला ?

**वेताळ्या**--माज नांव रागू आन् माझ्या ह्या परानपिर्येचं नांव अक्षी ग्वाड गुळवणी हाए बगा-साळू ह्मन साळू ! पन आह्मा दोगांचा पराकरम लइ जबरा ह्मून मला ह्मनत्यात 'येताळ्या,' आन् हिला ह्मनत्यात 'सटवाई.' दोगं हाऊंच तशीं ! हत जमल्येल समद राज ठ्येवा बसवून आन् आमा दोघास्नी द्या सोडून ह्या न्वोडग्यांवर ! योक योक चपराकीला धाधा न्हाई हानून पाडीन तर थूः माझ्या मिशीवर ! मिशीबी न्हाइ ह्मना, आन् हिचे तर इचारायाच नग ! न्वोडग्याच्या बायका आन् पोरं धेईल झाडावर लटकावून !

**सटवाई**—त्या बायांस्नीच न्होव, तर तुलाबी धेईन टांगून आन् बगत न्हाईन मजा !

**वेताळ्या**—मलाबी ? ( रडक्या स्वरानें ) मंग तुझ कस व्हईल ? आन् तुझ्या संग रातदिन झगडल बी क्वोन ? समद्या पिराथिवींत सटवाईशीं येताळ्या बिगर क्वोना ल्येकाच जुगनार हाये ? ( आंतून " काय चालवली आहेरे बडबड ! चला जा तिथून ! " ) चल माजी सखू !

[ जातात. जातांना ती त्याला पाडते.

**करणसिंग**—( पुढें येऊन स्वगत ) हा काय प्रकार असावा ? अद्भुत स्वर्ग-सुखाचा थोडासा अनुभव मिळतो न मिळतो तोंच ह्या वेताळसटवाईनें आपल्या भूतचेष्टांचें प्रदर्शन दाखवावें, ह्यावरून माझ्या भावी चरित्राचें दिग्दर्शन तर होत नाहींना ? प्रियतमेनें अर्पण केलेल्या प्रेमकुसुमांचे सान्निध्यानें ( फूल बाहेर काढून ) आरंभीं उल्लसित झालेलें मन आतां साशंक कां बरें व्हावें ? ( विचार करून ) आहे, शंकेला स्थळ आहे. मानी महाराणा ह्या गोष्टीला कधींहि संमति देणार नाहीं. अर्थात्, परिणाम समाधानकारक होईलसें दिसत नाहीं. असो. सर्व काळजी ह्या श्रीठाकुरजीला आहे. चला, आतां आपणहि थोडी विश्रांति घेऊन पुढच्या कामाला लागावें. [ जातो.

---

## प्रवेश तिसरा.

[ **स्थळ**—महाराणा संग्रामसिंहाचें शिबिर. महाराणा आपल्या तंबूंत पलंगावर निजला आहे व बाजूस जवानसिंग उभा आहे, असा प्रवेश. ]

**संग्रामसिंह**—जवानसिंग ! बाहेरची हकीगत याहून जास्त सांगण्यासारखी कांहीं नाहीं आं ? एकूण, आमच्या सर्व वीरांनीं हातांत बांगड्या भरल्या, आमच्या स्त्रिया जोगिणी झाल्या, व आमच्या छावणींत राजस्थानांतील महान् महान् योद्धे जमले असून पराक्रमाच्या लवलेशाचा मागमूसहि नाहींसा झाला आं ?

**जवानसिंग**—काय करावें सरकार ! बाबरशहाबरोबर या राजमंडळानें तूर्त लढाई बंद ठेवण्यासाठीं जो तह केला, त्यानें आमचे हातपाय जखडले गेले. सरकारची प्रकृति दुरुस्त होईपर्यंत मोहिमेला रजाच मिळाल्यासारखी आहे. आतां आपण स्त्रियांविषयीं विचारतां, त्याबद्दल जरी विशेष खुलासेवार माहिती मला देतां येणार नाहीं, तरी मला इतकें माहीत झालें आहे कीं, आपल्या राणी-वंशांतील कांहीं निवडक स्त्रियांसहवर्तमान राणीसाहेब व राणावतजी कमलावतीबाई, वल्लभाचार्यसाधूचे मठांत सरकारास आराम व्हावा ह्मणून श्रीठाकूरजीस कांहीं नवस करण्यासाठीं गेल्या आहेत.

**संग्रामसिंह**—( अंगावरील पांघरूण फेंकून ) त्या विधर्मी दुष्ट यवनांचा जेथें हमेषा उपद्रव अशा ठिकाणीं आमच्या स्त्रियांनीं आणि कुमारिकांनीं जाण्याचें धाडस केलें ?

**जवानसिंग**—सरकार ! त्याबद्दल आपण मुळींच फिकीर करूं नये. त्यांचे संरक्षणार्थ खुद्द बाबरशहानें फार कडक हुकूम सोडले आहेत.

**संग्रामसिंह**—बरोबर, मला त्याची मुळींच आठवण नव्हती. बाबरशहा-बद्दल असा संशय घेण्यांत मजकडून मोठी चूक झाली व तिची फेड झाली पाहिजे. ईश्वरापाशीं माझी एवढीच प्रार्थना आहे कीं, त्यानें मला या दुखण्यांतून लवकर उठवावें, ह्मणजे उभयतांचीं सैन्यें दोन्ही अंगांस तटस्थ उभीं ठेवून मध्यें फक्त आह्मी दोघे योद्धे उभे राहून युद्धप्रसंग करूं. ( तरवारीला हात घालतो. )

**जवानसिंग**—सरकार! आपण अंमळ शांत व्हा. आपल्या अंगांत ज्वर भरला आहे, आपण स्वस्थ पडून रहावें ह्मणजे कांहीं वेळानें थोडें बरें वाटेल.

**संग्रामसिंह**—जवानसिंग ! तूं ह्मणतोस माझ्या अंगांत ज्वर भरला आहे, आणि तें खरेंहि असेल; पण हे जे इतर महाराणे येथें जमले आहेत, त्यांच्या

अंगांत काय भरलें आहेरे? हा मारवाडचा मेघसिंह, हा जयपूरचा मल्ल गजसिंग, तो कुरावडचा जैतसिंग, तो शूर ह्मणविणारा सिलौदी तुवर, तो साळुंब्र्याचा उदयसिंग ठाकूर हे सगळे योद्धे येथें स्वस्थ बसून काय करतातरे? मला वाटतें, या सर्वांनां पक्षवायु झाला आहे, आणि त्यामुळें यांची वाचा व हालचाल अगदीं बंद पडलीं आहेत! यांच्या अंतःकरणाला एक प्रकारची कीड लागली आहे आणि तिनें यांच्यांतील सर्व चांगुलपणा, औदार्य व पराक्रम खाऊन फस्त केला आहे. हे वचनभ्रष्ट झाले, वाडवडिलांचा लौकिक यांनीं मातीला मिळविला, ईश्वराची भीति यांनां बिलकूल राहिली नाहीं!

**जवानसिंग**—महाराज! मनांत जरा शांतता धरा. आपण असें मोठमोठ्यानें बोलतां तें बाहेरील लोकांस ऐकूं जाऊन अगोदरच नाखूष असलेलीं त्यांचीं मनें जास्तच बिथरून जाण्याचा संभव आहे. वस्तुतः आपल्या आजारीपणामुळें त्यांच्या मनांतील लढाईचा उत्साह बहुतेक थिजल्यासारखा झाला आहे. माझी पक्की खातरी आहे कीं, चालू असलेल्या लढाईंत शिपायांचें त्यांचे तरवारीवांचून एक वेळ चालेल, पण ह्या दुर्बळ राजसमूहाचें महाराणा संग्रामसिंहावांचून एक क्षणभरहि निभावयाचें नाहीं!

**संग्रामसिंह**—( अमळ आंनदीत होऊन ) जवानसिंग! आजारी मनुष्याचें मन कसें तरी रिझवावें, ह्मणून तूं कांहीं तरी बोलतोस झालें. परंतु पहा, असे महान् महान् राणे, त्यांचे शूर शूर सरदार, तसेच राजस्थानांतील पराक्रमी ठाकूर, इतके सर्व येथें जमले असतां केवळ एक प्राणी बेमार पडला,—मग तो प्रत्यक्ष संग्रामसिंह असला ह्मणून काय झालें?—ह्मणून त्यांचें धैर्य इतकें खचून जावें काय? एक संग्रामसिंह बेमार पडला,—मी ह्मणतों त्यामुळें त्याचा अंतहि झाला, ह्मणून काय झालें? संग्रामसिंहाप्रमाणेंच शूर अशा तीस हजार योध्यांमध्यें त्याचें काम चालविणारा एकहि भेटणार नाहीं काय? ह्या राजेलोकांनीं एखादी मोठी सभा भरवून मी आजारी आहें तोंपर्यंत माझ्या जागीं काम करण्याकरितां एखाद्या चांगल्या योध्याची योजना कां करूं नये, हें मला समजत नाहीं.

**जवानसिंग**—खरेंच सरकार, ( आठवून ) आपणाला सांगायला विसरलों. आपण ह्मणतां अशी राजेलोकांची एक सभा भरून या योजनेविषयीं कांहीं विचार चालू आहे, असें माझे ऐकिवांत आहे.

**संग्रामसिंह**—( रागानें ) काय! येथपर्यंत मजल येऊन ठेपली आं? ह्या आजारीपणांतून मी उठत नाहीं, यांतच माझा अंत खात्रीनें होणार, असें गृहीत

धरून मला विचारल्याशिवाय या गोष्टींचा खल होऊं लागला आं? छे! छे!! पण ही माझीच वेडी समजूत! ते करतात तेंच बरोबर आहे. बरें जवानसिंग! या सैन्याचें आधिपत्य तरी कोणाकडे जाणार, हें तुला माहीत आहे का?

**जवानसिंग**—पदवी व मान ध्यानांत आणितां मारवाडचे राणा मेघसिंह या अधिकाराला पात्र दिसतात.

**संग्रामसिंह**—वहावा!! मारवाडचा राणा श्री पृथ्वीनाथ–श्री–सकलहिंदूधर्मप्रतिपालक राजाधिराज मेघसिंह महाराज! किती गोड शब्द हे! यांनीं तोंड कसें अगदीं भरून जातें! मात्र येवढेंच कीं, सर्व सैन्याचे हे अधिपति झाले, ह्मणजे व्रजभूमीचा उद्धार बाजूला राहून स्वतःचे राज्यांतील बंडाळी मोडण्याचे कामीं या सैन्याचा उपयोग केला न जावो, ह्मणजे झालें!! ह्या राजश्रींच्या कारस्थानी डोक्यांत पक्कें येऊन चुकलें आहे कीं, तुर्कांशीं येथें झगडत बसण्यापेक्षां आपल्या राज्यांतील धनाढ्य लोकांस लुटून फस्त करण्याचे कामीं या सैन्याचा उपयोग केल्यास ती गोष्ट विशेष फायदेशीर होईल!

**जवानसिंग**—ते कदाचित् जयपूरच्या गजसिंगाची नेमणूक करतील—

**संग्रामसिंह**—(हंसून) कां, तो खूब अगडबंब आहे, ह्मणून होय? जवानसिंग, तूं बध्यड डोक्याचा खराच; पण तुझ्या अंगीं जें धाडस व शौर्य आहे, तेंहि त्याच्यांत नाहीं रे! एखाद्या गलेलठ्ठ टोणग्याला आरी मारली तर त्यालाहि कांहीं चेतना येईल; पण या स्वारींत तीसुद्धां येणार नाहीं. बस, खायाला मिष्टान्न व पिण्याला यथेच्छ मदिरा मिळाली, कीं, झाली यांच्या महत्त्वाकांक्षेची सीमा—छे छे! असला मनुष्य बिलकूल कुचकामाचा!

**जवानसिंग**—बरें, रायसीनच्या सिलौदी तुवराची कदाचित् नेमणूक झाली तर? हा पहा कसा धीर, चतुर, शूर व मसलती योद्धा. ज्याला स्वतःचें राज्य नसल्यामुळें व्रजभूमीच्या मुक्तिकडेच ज्याचें पूर्ण लक्ष्य, त्याविषयीं सरकारचें काय मत आहे?

**संग्रामसिंह**—तुवराविषयीं कांहीं ह्मणणें नाहीं. लढाईचे वेळीं कसकशा योजना कराव्या लागतात, व लढाई सुरू झाली असतां पुढें जाऊन कसें लढावें, हें त्याला पूर्णपणें अवगत आहे; परंतु तो मोठा स्वार्थसाधु व पाताळयंत्री आहे! छे! छे! त्या सकलगुणसंपन्न बाबरशहाकडून ही पुण्यभूमि हिसकावून ती या तुवराचे हातीं देण्यांत महत्पाप होणार आहे. छे, हा इसम सेनापति होण्याचे लायक नाहीं!

**जवानसिंग**—बरें, जैतसिंह कुरावडचा मानकरी, याचेसंबंधीं आपलें काय मत आहे ? त्याचा तर कांहीं बोभाटा नाहीं ?

**संग्रामसिंह**—गोष्ट खरी. पण तो किती नीच आहे तें तुला माहीत नाहीं. मला असा बळकट संशय आहे, कीं, यानेंच आमच्या फौजेंतील कांहीं गुप्त गोष्टी बाबरशहास कळविल्या असाव्या, व त्यामुळेंच मुसलमानांचा आह्मांवर इतका पगडा बसला आहे.

**जवानसिंग**—एकंदरींत, आपण जेथून निघालों त्या मूळ पदावर पुनः परत आलें पाहिजे ! ह्मणजे, महाराणाजींचें दुखणें बरें झाल्याखेरीज लढाईस आरंभ होणें शक्य नाहीं–हीच गोष्ट ठरली.

**संग्रामसिंह**—( हंसून ) जवानसिंग, बराच वस्ताद आहेस कीरे तूं ? बोलतां बोलतां माझ्याच तोंडून माझा मूर्खपणा वदविलास ? पण पहा, एकामागून एक अशीं ज्या योद्धयांचीं नांवें तूं घेतलींस, ते सर्व महत्त्वाकांक्षेचे झपाट्यांत माझी बरोबरी किंबहुना वरचढ करण्याच्या बेतांत आहेत असें दिसून आल्यामुळें त्यांच्यावर टीका करणें मला भाग पडलें. एरवीं, त्यांनीं वाटेल ते ढंग केले तरी हा संग्रामसिंह कधींहि मनावर घेणार नाहीं. ( जरा कान दिलासें करून ) अरे, रणवाद्यांचा आवाज कोठून ऐकूं येतो ?

**जवानसिंग**—राणा मेघसिंहाचे लष्करांतलीं वाद्यें असावीं हीं.

**संग्रामसिंह**—तूं बहिरा आहेस ! ( उठण्याचा प्रयत्न करितो. ) हीं यवनी वाद्यें दिसतात. निःसंशय तुर्क छावणींत शिरले आहेत. ( उठून तरवारीस हात घालतो. )

**जवानसिंग**—महाराज ! सरकार ! हें काय ? आपण स्वस्थ रहा. (मोठ्यानें) कोण आहेरे बाहेर ? या माझ्या मदतीला ! (दोन इसम आंत प्रवेश करितात. सर्व मिळून राण्यास बिछान्यावर निजविण्याचा प्रयत्न करितात. )

**संग्रामसिंह**— ( संतापानें ) जवानसिंग ! हरामखोरा ! बस यांत कांहीं तरी दगा आहे ! ( त्वेषानें दांत चावून ) काय करूं रे ? या वेळीं माझ्या अंगांत ताकद असती तर या दगेखोरांचीं टाळकीं फोडून निकाल केला असता !

**जवानसिंग**—सत्य आहे महाराज ! आपल्या अंगांत या वेळीं जर ताकद असती तर फार उत्तम झालें असतें; आणि तिचा आपण ह्मणतां तसा उपयोग होऊन मी जरी मरून गेलों असतों तरी आपली प्रकृति पूर्ववत झाल्यानें सर्व हिंदुस्थानचें केवढें कार्य झालें असतें !

**संग्रामसिंह**—( खजील होऊन ) अहाहा! जवानसिंग! तूं किती तरी प्रामाणिक आणि विश्वासू आहेस! उतावीळपणामुळें मीं तुला अपशब्दांनीं दुखविलें, याची मला माफी कर. काय करूं! या ज्वरानें माझ्या अगांत भडका उडविल्यामुळें मी काय करतों, हें माझें मलाच समजत नाहीं. तुला अपशब्द बोलणारा हा ज्वर आहे, संग्रामसिंह नाहीं!

**जवानसिंग**—महाराज! हें असलें कांहीं आपण बिलकुल मनांत आणूं नका. स्वस्थ पडा. काय गडबड आहे ती मी पाहून येतों.

**संग्रामसिंह**—जा, जा, लवकर जा. कोण लोक आहेत तें पाहून ये.

[ जवानसिंग जातो.

---

## प्रवेश चौथा.

[ **स्थळ**—रजपुतांच्या छावणींतील एक रस्ता. ]

**जवानसिंग**—( स्वगत ) हा काय प्रकार असावा बरें! महाराणाजींनां औषधोपचार करण्यासाठीं ह्मणून खुद्द बाबरशहानें आपला दरबारी हकीम पाठविला असून त्याचीच ही सर्व गडबड आहे. ही गोष्ट बरीच चमत्कारिक नाहीं काय? मनुष्याची उपकारबुद्धि कितीहि उत्कृष्ट असली तरी स्वार्थापासून केवळ अबाधित असणें मला तरी अशक्य वाटतें; मग हीं तर प्रचंड राजकारस्थानें व तींहि दोन कट्टया शत्रूंमध्यें!! छे, मला नाहीं ही गोष्ट पटत! महाराणाजी बरे होण्यांत बाबराला काय फायदा? निःसंशय, यांत कांहींतरी दगा आहे. थोड्याशा प्रापंचिक फायद्यासाठीं प्रत्यक्ष सख्खे भाऊ एकमेकांच्या जिवावर उदार झाल्याचीं हजारों उदाहरणें ह्याच तुर्कांच्या वंशजांत नित्यशः घडल्याचें जर आह्मी ऐकतों, तर मग त्यांच्यांतलाच हा बाबरशहा आपल्या शत्रूसाठीं अमृतसंजीवनी पाठवून देईल, ही कल्पना तरी कशी करावी? बाबरशहा मोठा उदार आहे, असा महाराणाजींचा समज आहे; तथापि ह्या गोष्टींत त्याचा भरवंसा कोणीं धरावा! तें कांहीं नाहीं, या कामांत फार सावधपणानें वागलें पाहिजे. अगोदर त्या करणसिंगाचे डेऱ्यावर जावें. त्याच्या खासदारावर याच हकीमाचे औषधीचा प्रयोग होत आहे असें समजतें. शिवाय, मीं बोलावणें पाठविल्याप्रमाणें हे पहा आमचे प्रत्यक्ष राजवैद्य पुरोहित महाराजहि तिकडेच चालले आहेत. चला, हाच तो करणसिंगाचा तंबू. ( एका बाजूनें राजवैद्य प्रवेश करितो. खासदार निजलेला असून त्याचेजवळ हकीम बसला आहे. करणसिंग उभा आहे. एका बाजूस कुत्रा पडून आहे. )

**पुरोहित**—( जवानसिंगास ) काय हकीगत आहे ? फार गर्मी होते बुवा!

**जवानसिंग**—महाराज, आपल्यासमोर त्या बिमाऱ्याजवळ बसलेला हा एक यवनी वैद्य असून त्याला बाबरशहानें मोठ्या लवाजम्यानिशीं महाराणाजींनां औषध देऊन बरें करण्याकरितां पाठविलें आहे. तो बिमार इसम–करणसिंगाचा खासदार–याच तापानें आजारी आहे, आणि त्याच्यावर या हकीमाच्या औषधाचा प्रयोग होत आहे. एकंदरींत प्रकरण जरा नाजुक असल्यामुळें आपल्या नजरेखालून एक वेळ गेल्यानें आह्मीं बेफिकीर होऊं, असा विचार करून आपणास येथपर्यंत येण्याचे श्रम दिले आहेत.

**पुरोहित**—आपण केलें हें सर्व ठीक; परंतु अशा कडक उन्हांत येथें येण्याचे श्रम मात्र फार व विनाकारण झाले. त्यापेक्षां हा रोगी, वैद्य आणि इतर सारें लटांबर, माझ्याच तंबूवर आणिलें असतें तर सर्व त्रास चुकून कामाचा निकालहि झटपट जिथच्या तिथें उडवून दिला असता! आणि कांहो, ही कोणाची जागा ? काय घाण ही? आपलें मस्तक तर फिरूं लागलें बुवा! ह्या असल्या हवेच्या संसर्गानें आमचीहि तव्यत बिघडून जावयाची!

**करणसिंग**—महाराज, माझी ही गरीबाची झोंपडी आहे. आपले पाय येथें लागले, हा मजवर मोठाच अनुग्रह झाला. बाकी, ही जागा आपणासारख्या थोर व विलासी पुरुषांनीं उभें राहण्याचेहि लायक नाहीं, हें सत्य आहे. काय करावें, गरीबीमुळें इलाज नाहीं.

**पुरोहित**—तें समजलों; परंतु आह्मी येथें येणार हें जर ठाऊक होतें, तर त्यासारखी कांहीं तयारी तर करावयाची होती! स्वतःच्या नाहीं तर लोकांपासून –निदान आमच्या तंबूंतून तरी कांहीं जरूर त्या जिनसा आणावयाच्या होत्या. हें काय, येथें सर्व कचराच कचरा! बसावयाला एखादा गालीचा, निदान चांगलीशी सत्रंजी तरी असावयाची होती ? तहान लागली तर पाणी प्यावयास हीं मातीचीं गाडगींच दिसताहेत! अहो, आमची राहिली पण आमच्या कपड्यालत्त्याची तरी कांहीं कींव तुह्मांला यावयाला पाहिजे होती ? बरें, चला, कुठें आहेत ते हकीम ? चला त्यांचेकडे.

**जवानसिंग**—थोडे थांबा. महाराज! हा हकीम जातीचा मुसलमान, हिंदूंचा कट्टा दुस्मान, अशाच्या हातचें औषध महाराण्यांस देणें बरें दिसतें का ?

**पुरोहित**—वास्तविक पाहतां ‘औषधं जान्हवीतोयं वैद्यो नारायणो हरिः।’ या न्यायानें कोणतेंहि औषध असलें व तें देणारा कोणीहि असला तरी कांहीं

हरकत नाहीं. परंतु हल्लींच्या प्रसंगाकडे नजर देतां मात्र थोडा सावधपण बाळगिला पाहिजे.

**जवानसिंग**—माझेंहि ह्मणणें तेंच. समजा, बाबरानें ह्या हकीमाचे हातू महाराणाजींस विषप्रयोग करविला—

**पुरोहित**—बरोबर. मलाहि तोच संशय येतो. हे बेटे यवन विषप्रयोगांत फार प्रवीण असतात, व हीं कामें ते अशा खुबीनें करितात कीं, ज्यावर प्रयोग होतो, त्यालाहि तो समजून न येतां हळुहळू झिजत जाऊन शेवटीं तो मरतो. पहा कधीं कधीं हे कागदांत विष घालून त्यावर कांहीं मजकूर लिहून तो आपल्य वैऱ्याकडे पाठवितात, आणि त्यानें तो हातांत घेतला कीं भरलेच त्याचे दिवस ह्मणून समजावें! शिवाय, यांचें कपटहि कोणाच्या ध्यानीं सहसा येत नाहीं. तरी पण आमच्यासारख्यांपुढें ह्यांची मात्रा बिलकुल चालत नांहीं. आह्मी हें सर्व ताबडतोब जाणतों. आतांच पहा कशी मजा उडवून देतों ती. चला, तिकडे चला. ( त्याची व हकीमाची दृष्टादृष्ट होते. हकीम पुन्हां रोग्याकडे पाहूं लागतो. ) ( एकीकडे ) जवानसिंग! पाहिलेंत ? मला पाहिल्याबरोबर त्यानें कशी मान खालीं घातली ती! बस, खातरीनें कपट. थिजलाच बेटा मला पाहून. आपण बोलूंच त्याच्याशीं आतां. ( त्याचेपुढें जाऊन ऐटीनें मान वांकडी करून उभा रहातो. तो मुळींच पहात नाहीं. ) ( स्वगत ) काय मगरूर आहे ? मुजराहि करित नाहीं ? ( ऐटीनें ) सलाम हकीमजी!

**हकीम**—( वर न पाहतां ) सलाम अलेकम.

**पुरोहित**—आपणच बाबराचे हकीम का ? तुमच्या विद्येविषयीं तुमच्याशीं मला कांहीं बोलावयाचें आहे.

**हकीम**—मला वाटतें, ( उठून, हलक्या स्वरानें ) वैद्यशास्त्राची आपणाला जर तादृश माहिती असती तर आपण हा प्रश्न या ठिकाणीं विचारिलाच नसता. हकीम लोक बेमाऱ्याच्या कोठडींत कधींहि वादविवाद करित नसतात. पहा, तो कुत्रा सुद्धां हळुहळूच गुरगुरतो आहे. अशा वेळीं भुंकूं नये हें त्याला देखील समजतें. त्यापासून तरी कांहीं उपदेश घ्या. मजपाशीं आपणास कांहीं बोलावयाचेंच असेल तर चला तंबूबाहेर, तेथें बोलूं. ( पुढें येतात. )

**पुरोहित**—बरें तसें का होईना. ( ऐटीनें ) कां हो, तुह्मी आपल्या कामांत प्रवीण आहां याबद्दल तुमच्यापाशीं कांहीं दाखले आहेत का ?

**हकीम**—दाखला–आणि तो कशाला पाहिजे ? हातचें कंकण पहाण्यास आरसा काय करावयाचा ? हें पहा, दाखले दाखवून आपल्या औषधांची बढाई मारून वैद्यक्रिया चालविणारे लोक निवळ ढोंगी होत. असले हकीम व त्यांचीं औषधें जगावर उपकाराच्या ऐवजीं प्रसंगविशेषीं भयंकर अपकारच करितात; शहाणे लोक ह्या दाखले दाखविणाऱ्या हकीमांस लांबूनच नमस्कार करित असतात. आतां तुमचा आग्रहच असेल तर हा पहा माझा दाखला. याचे इतका उत्तम दाखला ह्या जगांत कोणालाहि मिळाला नसेल! शहान्शहा बाबरशहा–जो पराक्रम, स्वधर्म–प्रीति, औदार्य इत्यादि बिनमोल गुणांचें केवळ माहेरघर, त्यानें मालिक महाराणा संग्रामसिंह यांनां माझ्या शिफारशीचा हा खलिता दिला आहे. ( खलिता पुढें करितो. )

**पुरोहित**—( जवानसिंगाकडे साशंक पाहतो ) ठेवा, तो आपल्याशींच ठेवा, आह्मी त्याला हात लावूं इच्छित नाहीं. आमचें ह्मणणें इतकेंच, कीं, तुमच्या गुणांची पारख प्रत्यक्ष आह्मांला स्वचक्षूंनीं करून घेतली पाहिजे. त्याशिवाय महाराण्यांचे बिछान्याशीं तुमचें जाणें होणार नाहीं.

**हकीम**—हकीमाच्या गुणांची परीक्षा ह्मटली, ह्मणजे त्याच्या औषधानें रोग्याची व्यथा दूर होते किंवा नाहीं हें पहाणें. आतां याच रोग्याकडे पहा. तुमच्या अडाणी वैद्यांनीं यावर नाना उपाय योजिले, परंतु ते सर्व निष्फळ झाले. मीं यास औषध देऊन सुमारें अर्धा तास झाला. यावेळीं याला गाढ निद्रा लागली आहे. आणखी थोड्या वेळानें हा जागा होईल, तेव्हां हा कोणत्या स्थितींत असेल, तें आपण प्रत्यक्ष पहालच. आपण अमीरी पेशाचे लोक. असल्या दुष्ट हवेंत राहण्याचा आपणाला क्वचित वक्त येतो. परंतु आह्मांसारख्या फकीरांस तिची चांगली पछान आहे, व तिच्यापासून बचाव करण्याचे उपायहि आह्मी चांगले जाणतों. अशा प्रसंगीं आमची एखादी जडीबुट्टी जें काम करील तें तुमच्या बहुमोल रसायनांनींहि होणार नाहीं !

**पुरोहित**—आपण इतकें लांब जाण्याचें कारण नाहीं. तें सर्व आह्मांला कळतें आहे, आणि वैद्यशास्त्रांत तुमच्यापेक्षां आह्मी पुष्कळ प्रवीणहि आहों. मला फक्त तुह्मी एवढें सांगा, कीं, हें तुमचें औषध कोणकोणत्या वनस्पतींचें बनविलें आहे व तें कसें केलें आहे ? जास्ती पंचाइतीची गरज नाहीं.

**हकीम**—आपण ह्मणतां तें सत्य आहे; परंतु तसें करण्याला मला माझ्या धन्याचा हुकूम नाहीं. महाराणा संग्रामसिंह यांनां औषध देऊन बरें करणें, एवढेंच

माझें काम आहे; दुसरीतिसरी गोष्ट मी जाणत नाहीं. माझ्या औषधानें जर महाराण्यांची तब्येत जास्त बिघडली तर तुमच्या हातीं समशेरी आहेतच—एकदम माझें डोकें उडवून द्या; परंतु तुह्मां अडाण्यांपुढें माझ्या औषधाची फोड करणें माझ्यानें कदापि होणार नाहीं. विनाकारण माझ्या कामाला तुह्मीं हरकत आणूं नये. ( रोग्याजवळ जातो. )

**जवानसिंग**—कां पुरोहित महाराज! काय सल्ला आहे आपली ?

**पुरोहित**—थोडे थांबा, इतक्यांत त्याची भंबेरी उडते आहे. त्या रोग्याची काय हालहवाल आहे ती पाहूं चला. मोठ्या ऐटीच्या गोष्टी सांगतो आहे, त्यांतलें तथ्य तर कळेल. ( दोघे रोग्याजवळ जातात. )

**हकीम**—पहा, हा आतां जागा झाला. थोडें थांबा, तो आपोआप उठून बसेल. ( रोगी उठून बसतो. ) पहा आतां त्याची नाडी.

**पुरोहित**—पहा, पहा, जवानसिंग! तुह्मींच त्याच्या अंगाला हात लावून पहा. ( स्वगत ) हे सांसर्गिक रोग. कुठें पंचाईत करित बसूं!

**जवानसिंग**—काय आश्चर्य आहे हो! अंगांत बिलकुल ताप नाहीं!

**पुरोहित**—अहो त्याच्या नाड्या मेल्या! सर्वांग गार पडलें! पहातां काय? मृत्युपंथाला लागला तो प्राणी!

**हकीम**—( स्वगत ) ह्या बिमाऱ्याच्या अंगांतील उष्णता नाहींशी होऊन ती या अगडबंबाच्या डोक्यांत शिरून तिनें त्यांतला मेंदू मात्र जाळून खाक केला असावा—बेवकूब!

**जवानसिंग**—छे, उगीच कांहीं तरी बोलतां झालें. तो कसा चांगला शुद्धीवर आहेसा दिसतो. ( खासदार बोलतो—धनीसाहेब कुठें आहेत ? त्यांनां एक गोष्ट सांगावयाची आहे. )

**पुरोहित**—अरे, मला तूं ओळखतोस काय ?

**खासदार**—पुरोहित महाराज! मज गरिबाला आपला आशीर्वाद असावा.

**पुरोहित**—हा घे आशीर्वाद, त्यांनां आमच्याजवळ तोटा नाहीं. 'आयुष्मान् भव! सुखी भव!'

**जवानसिंग**—अरे हे पहा, तुझे धनी येथेंच आहेत. तूं काय गोष्ट सांगणार होतास ती सांग.

**खासदार**—महाराज! थोड्या वेळापूर्वीं मीं असें पाहिलें कीं, कांहीं दुष्ट लोक मला एका भयंकर जागीं ओढून नेत होते; इतक्यांत दयाळू अंतःकरणाचा एक

यवन येऊन त्यानें मला त्यांच्या हातून सोडवून आणिलें. ( इतक्यांत समोर पाहतो. ) हीच ती मूर्ति. हाच तो यवन. ( त्याच्या पायां पडतो. )

**पुरोहित**—अरे हो-हो! काय मूर्ख आहे बेटा!! आमच्या पायां पडावयाचें सोडून यवनाच्या पायां पडतो! अरे, स्वप्नांत तूं आह्मांलाच पाहिलें असशील. आह्मीं पुष्कळांच्या स्वप्नांत दिसत असतों.

**खासदार**—छे, कधीं विसरणार नाहीं—हाच तो यवन!

**जवानसिंग**—(स्वगत) याच्या औषधींत अजब गुण आहे, यांत संशय नाहीं. ( पुढें येऊन ) चला हकीमसाहेब, चला, महाराणाजींचे डेऱ्यावर.

**पुरोहित**—कां, तुह्मीहि त्या खासदारासारखेच भ्रमिष्ट झालां वाटतें?

**जवानसिंग**—छे, मुळींच नाहीं! मी योग्य तेंच करितों. चला हकीमजी!

**पुरोहित**—असें काय! हाच आमचा मान अं? येथें अशा ऐन उन्हांत आणून अखेर आमची सल्लामसलत धाव्यावर बसविलीत? थांबा, याचा चांगलाच वचपा काढीन! आतां जाऊन सर्व राजमंडळाला ही हकीगत सांगतों, व तुमचा सगळा बेत उलथून पाडतों. तुह्मीं एक मला धाव्यावर बसविलेंत, ह्मणून महाराणा सर्व राजमंडळाच्या विरुद्ध जाऊं शकणार नाहीं, हें ध्यानांत ठेवा. [ जातात.

---

## प्रवेश पांचवा.

[ **स्थळ**—महाराण्याचें शिबिर. राणा पलंगावर पडला आहे, व समोर करणसिंग उभा आहे, असा प्रवेश. ]

**संग्रामसिंह**—एकूण, छावणींत जी ही गडबड आहे ती सर्व त्या हकीमाचीच? ठीक आहे, त्याचें औषध आपण घेणार. बाबरशहा मोठा थोर पुरुष आहे.

**करणसिंग**—सरकार, त्याच्या औषधाचा गुण अगदीं त्वरित येतो. मी तर तें औषध ह्मणजे केवळ अमृतच समजतों!

**संग्रामसिंह**—फार उत्तम, तें घेण्याला आमच्याकडून मुळींच हरकत नाहीं. बरें, करणसिंग, आजकाल तुमच्याकडे कामगिरी काय आहे?

**करणसिंग**—सरकार, वल्लभाचार्यसाधूंकडे मला कामगिरीवर पाठविलें होतें; तिकडून मी नुकताच परत आलों.

**संग्रामसिंह**—( आश्चर्यानें ) वल्लभाचार्यांकडे? कोणाच्या हुकुमानें?

**करणसिंग**—धर्मयुद्धार्थ येथें जमलेल्या राजसमूहाच्या आज्ञेवरून सरकार.

**संग्रामसिंह**—काय ! त्या राजसमूहाचे आह्मी प्रमुख असतां आह्माला न विचारतां त्यांनीं ही आज्ञा केली ?

**करणसिंग**—सरकार, याचा विचार करणें माझें काम नाहीं. मी फक्त हुकुमाचा तावेदार.

**संग्रामसिंह**—वाजवी आहे तुमचें म्हणणें. तुमच्याकडे मुळींच दोष नाहीं. ईशकृपेनें या दुखण्यांतून उठूं द्या, या राजमंडळाचा चांगलाच समाचार घेईन. बरें तुमच्यावरोबर निरोप तरी कोणता गेला होता ?

**करणसिंग**—माफी असावी. ज्यांनीं मला पाठविलें तेच या प्रश्नाचें समाधान-कारक उत्तर देऊं शकतील !

**संग्रामसिंह**—(संतापून) दरबारी डावपेंचांचीं व संदिग्ध भाषणें ऐकणारा हा संग्रामसिंह नव्हे ! काय हकीगत असेल ती साफ सांगा.

**करणसिंग**—सरकारचा ह्या बाबतींत गैरसमज होत आहे. निरोपाची प्रत्यक्ष माहिती मला नाहीं. त्या साधूच्या नांवचा मोहरबंद खलिता मजपाशीं दिला होता. तथापि सरकारचें समाधान होण्यासारखें असेल तर ह्या निरोपाचें बाह्यस्वरूप जें मला माहीत आहे तें मी निवेदन करीन.

**संग्रामसिंह**—बोला, बोला, काय माहीत आहे तेंच बोला.

**करणसिंग**—सरकार, ह्या साधूच्या मध्यस्थीनें तुर्क आणि रजपूत यांमध्यें—

**संग्रामसिंह**—( एकदम ) तूर्त तह करावयाचा, हेंच ना ?

**करणसिंग**—होय, आणि तो केवळ तूर्तपुरताच नाहीं तर जमल्यास कायमचा करून रजपुतांनीं आपलीं सैन्यें घेऊन एकदम स्वदेशीं परत जावयाचें.

**संग्रामसिंह**—या राजमंडळाच्या नेभळेपणाबद्दल जरी आरंभापासून माझें मन मला स्पष्ट सांगत होतें, तरी देखील असल्या नीच व अपमानकारक कृत्याला हे प्रवृत्त होतील, असें मला कधींहि वाटलें नाहीं. बरें,करणसिंग! हा निरोप घेऊन जातांना खुद्द तुम्हाला तरी कसें वाटलें ?

**करणसिंग**—मला ? बरेंच वाटलें. कारण, ज्या सेनाधिपतीच्या इभ्रतीवर मी येथें आलों, त्यांच्या जिवाला चैन नाहीं, व त्यांच्या जागीं एखाद्या कमकुवतानें काम करण्याचा आव घालावा, व त्याच्या हाताखालीं आम्हीं लढून पराभव करून घ्यावा, त्यापेक्षां यवनाशीं सख्य झालेलें काय वाईट !

**संग्रामसिंह**—बरें, हें सख्य तरी कोणत्या अटीवर होणार ?

**करणसिंग**—तें मला माहीत नाहीं.

**संग्रामसिंह**—त्या वल्लभाचार्यासंबंधीं तुमचें काय मत आहे ? माथेफिरू कीं दगेखोर ? तपस्वी का ढोंगी ?

**करणसिंग**—तो माथेफिरू मुळींच नाहीं. मात्र कधीं कधीं त्याचें वर्तन वरवर पहाणाराला अमळ चमत्कारिक दिसतें असें मींहि ऐकिलें आहे; व कदाचित् त्यामुळेंच त्यानें स्वत:वर मुसलमान लोकांची जबरदस्त श्रद्धा बसवून घेतली असावी. माझ्या मतें तो पहिल्या प्रतीचा कारस्थानी पुरुष असून शिवाय महान् भगवद्भक्तहि आहे.

**संग्रामसिंह**—या युद्धाबद्दल त्याचें धोरण कसें काय दिसतें ?

**करणसिंग**—याविषयीं तो बराच निराश दिसतो.

**संग्रामसिंह**—मला वाटतें, हा तुमचा साधूहि या नामर्द राजमंडळा-सारखाच भेंकड आहे. यांच्या आरंभींच्या त्या घोरतर प्रतिज्ञा व तो प्रचंड आवेश आतां कोठें लपून बसला ? घरीं जाण्याची सल्ला देणारा भेटला, कीं यांची एकी झालीच. आणि तीच शत्रूवर एकदम तुटून पडण्याची कोणीं मसलत काढिली कीं सर्वांचे पाय मागें व पुरा मतभेद ! नशीब त्या व्रजभूमीचें !

( चोपदार प्रवेश करतो. )

**चोपदार**—( मुजरा करून ) सरकार ! राजा सिलैदी तुवर व राव जैतसिंग मुलाखतीची परवानगी मागतात.

**संग्रामसिंह**—असें काय ? आह्मी अद्याप जिवंत आहों असें ते मानितात, ही मोठीच गोष्ट समजली पाहिजे ! करणसिंग, जा, आणि जवानसिंगाला व त्या हकीमाला ताबडतोब घेऊन या. (करणसिंग जातो. चोपदारास) जा, दे त्यांनां आंत पाठवून.

( तुवर व जैतसिंग प्रवेश करितात. )

**संग्रामसिंह**—बसा, आज वाट चुकलांत वाटतें ?

**जैतसिंग**—महाराज ! राजमंडळाला आपल्या प्रकृतीविषयीं फार चिंता उत्पन्न होऊन त्यांनीं आह्मांला आपल्या समाचारासाठीं पाठविलें आहे.

**संग्रामसिंह**—आह्माला ज्वर येऊं लागून आज सुमारें पंधरा दिवस झाले. इतक्या काळांत राजमंडळाला आमच्या प्रकृतीबद्दल पराकाष्ठेची काळजी लागली असून ती स्वत:च्या इच्छेविरुद्ध आमच्यापासून छपवून ठेवणें भाग पडलें ! कारण, न जाणो, समाचार घेण्याला कोणी पाठविल्यानें आजारी मनुष्याला जरूर

असणाऱ्या शांततेचा भंग होऊन आमची तब्बेत जास्त बिघडली तर? परंतु आजची संधि त्यांनां उत्तम सांपडली! कारण, तसा कांहीं प्रकार घडून आल्यास औषध देण्याला नामांकित हकीम छावणींत आलेला आहे.

**जैतसिंग**—( खट्टू होऊन तुवरास एकीकडे ) असल्या तिखट भाषणाला माझ्यानें उत्तर देववत नाहीं. तुह्मीच बोला.

**तुवर**—महाराज! राजसमूहानें आह्मांला इकडे पाठविण्याचें मुख्य कारण हें, कीं, बाबरशहाकडून जो हकीम आला आहे व ज्याचें औषध आपणाला देण्याचा कांहीं लोकांचा विचार झाला आहे, त्या हकिमाबद्दल संशय घेण्यासारखीं कांहीं कारणें उपस्थित झालीं असून त्यांची शहानिशा होईपर्यंत सरकारांनीं औषध घेऊन प्रकृति धोक्यांत घालूं नये, अशी विनंति आहे. प्रत्यक्ष आपले राजवैद्यहि ह्या गोष्टीच्या अगदीं विरुद्ध आहेत.

( इतक्यांत चोपदार प्रवेश करून करणसिंग, हकीम वगैरे आल्याची वर्दी देतो. )

**संग्रामसिंह**—वः वेळेवर आले! दे त्यांनां आंत पाठवून. ( ते येतात व मुजरे होतात. ) या हकीमसाहेब! आपलीच वाट पहात होतों. या आमच्या राजमंडळाच्या प्रतिनिधींनां तुमच्यासंबंधीं मोठीं संशयाचीं कारणें उत्पन्न झालेलीं दिसत आहेत; परंतु बाबरशहावर माझा पूर्ण विश्वास आहे. आह्मांला पक्की खातरी वाटते कीं, जो खरा शूर आहे तो आपल्या शत्रूला दग्यानें कधींहि मारणार नाहीं!

**हकीम**—हुजूर! बाबरशहा जरी आपला शत्रु असला तरी तो असल्या प्रसंगीं नाहीं! ( खलिता देतो. )

**संग्रामसिंह**—( उघडून पाहून ) शहानशहाचा मी फार आभारी आहें. तुम्ही म्हणतां तें अगदीं बरोबर आहे. आम्ही तुमचें औषध घेण्याला तयार आहों.

**तुवर**—महाराज, आमच्या विनंतीकडे दुर्लक्ष्य होऊं नये.

**संग्रामसिंह**—तुमच्या विनंतीचा विचार पूर्वीच करून ठेविला आहे. ज्या प्रेमभावानें राजमंडळानें तुम्हांला इकडे पाठविलें, त्याबद्दल मी तुम्हां सर्वांचा फार आभारी आहें. ईशकृपेनें यांतून उठलों, तर पुन्हा तुमच्यामध्यें येऊन मिसळेन; आणि यांतच आमचा अंत झाला तर तुह्मी सर्व मिळून हा देह अग्निनारायणाला अर्पण करा. जवानसिंग! तूं आजपर्यंत जी एकनिष्ठेनें माझी सेवा केलीस तिजबद्दल मी तुझा अत्यंत ऋणी आहें. ईश्वर तुझें कल्याण करो. तसाच तो करणसिंग. करणसिंग! तूंहि मोठा प्रामाणिक, विश्वासू व खरा रजपूत आहेस.

जवानसिंग! राणीवशांत तूर्त कांहीं खबर देऊं नको, समजलास? हकीमसाहेब! लागा आपल्या कामाला.

**हकीम**—( नाडी पहातो व औषध तयार करून पेला पुढें करितो. ) मलिक महाराणा संग्रामसिंहजी! हें अमृत प्राशन करावें. खुदाच्या कृपेनें आपल्याला त्वरित आराम होईल.

**संग्रामसिंह**—थोडे थांबा. माझा हात पाहिलात तसाच तुमचाहि मला पाहूं द्या. आह्मीहि थोडी वैद्यक्रिया जाणतों! (नाडी पाहून स्वगत) याची नाडी एखाद्या बालकाप्रमाणें शांत चालली आहे. राजेलोकांनां विषप्रयोग करणाराची नाडी इतकी शांत कधींहि सांपडणार नाहीं.(उघड) जवानसिंग! या हकीमाच्या औषधानें आमचा कसाहि परिणाम होवो, ह्याची बिदागी सन्मानानें झाली पाहिजे. हकीमसाहेब, आपल्या थोर बाबरशहाला आमचा सलाम सांगून कळवा कीं, जर आह्माला मृत्यु आलाच, तर तो केवळ आमची आयुर्मर्यादा संपली ह्मणून, आणि जर यांतून सुदैवानें वांचलों तर रणशूरांनां योग्य अशा रीतीनें मी तुमचे आभार मानीन. ( औषध पितो ) जय गोविंदजी!

[ पडदा पडतो. ]

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

[ **स्थळ**—रजपुतांचे शिबिरांतील एक रस्ता. सिलैदि तुवर व जैतासिंग बोलत चालले आहेत, असा प्रवेश. ]

**तुवर**—कसें काय जैतसिंग! चेहरा बराच उतरलेला दिसतो ?

**जैतसिंग**—चेहरा उतरण्याला काय झालें आहे! ( मिशांनां पीळ देतो. )

**तुवर**—तुह्मी कांहीं ह्मणा, परंतु मिशांनां नवीन पीळ भरण्याचे श्रम घेत आहां यावरून त्यांची ऐट नुकतीच थोडी घसरली होती, एवढें अनुमान सहज निघतें!

**जैतसिंग**—तुमची नजर बरीच बारीक आहे हो!

**तुवर**—तिनें तुमचें हृद्गत बरोबर ताडलें, त्या अर्थी ती तशी असलीच पाहिजे!

**जैतसिंग**—असेंच केवळ ह्मणतां येत नाहीं. कारण, माझ्या मनांत कोणत्याहि विवक्षित प्रकारचे विचार मुळींच चालले नाहींत. मात्र संग्रामसिंहानें आपणांशीं आतां जें वर्तन केलें, त्याबद्दल थोडें वाईट वाटत आहे. ( रोखून ) पण तुमच्या डोक्यांतहि कांहीं घडामोड सुरू असलीच पाहिजे!

**तुवर**—तुमचा तर्क अगदींच खोटा नाहीं; परंतु आतां पहावयाचें इतकेंच कीं ह्या विचाररूपी वृक्षाचें बीजारोपण तुमच्या व माझ्या डोक्यांत एकाच वेळीं व एकाच्याच हातून झालें आहे, तर त्याचीं फळेंहि एकच रंगरूपाचीं येतात कीं नाहीं ?

**जैतसिंग**—हें तुमचें आडपडद्याचें व दरबारी भाषण अम्मळ बाजूला ठेवून थोडे मोकळ्या मनानें बोला. तुमचें धोरण माझे लक्ष्यांत बरोबर आलें नाहीं.

**तुवर**—धोरण कांहीं मोठेंसें खोल नाहीं. तें सर्व उघड उघड आहे. तुह्माला स्पष्ट सांगतों, संग्रामसिंहानें नुकतेंच आपणांशीं जें वर्तन केलें, त्याचा तुमच्या मनावर जरी फारसा परिणाम झाला नसला, तरी मला त्याची फार चीड आली आहे.

**जैतसिंग**—तुह्मी ह्मणतां ते विकार माझ्या मनाला झालेच नाहींत, हा तुमचा गैरसमज आहे. आणि तुह्मींआह्मींचसे काय, पण राजमंडळांतील—किंबहुना सैन्यांतील सर्व लोकांच्या मनाचीहि तीच स्थिति झाली आहे; परंतु मी ह्मणतों, असें वाईट वाटून घेण्यांत काय हंशील आहे ? हें असें होणार, हें पुष्कळांनीं आरंभींच भविष्य केलें होतें.

**तुवर**—काय गोष्टी सांगतां! आपण मानानें व शौर्यानें संग्रामसिंहाच्या तोडीचे असून एखाद्या यःकश्चित् भिकाऱ्याप्रमाणें त्याचें मर्मभेदक भाषण सहन करावें, हें आपणांस शोभतें काय ?

**जैतसिंग**—हो, खरी गोष्ट. पण तिचा प्रतिकार करण्याला उपाय ?

**तुवर**—उपाय ? शोधावयास गेलें तर सांपडलाच पाहिजे! मात्र शोधण्याची इच्छा पाहिजे. ( जैतसिंगाकडे बारीक दृष्टीनें पाहतो. )

**जैतसिंग**—( साशंक मुद्रेनें ) आपल्या भाषणावरून व एकंदर आविर्भावावरून माझा तर्क होतो कीं, तुह्मीं कांहीं विशेष बेत ठरविला असून त्यासंबंधीं माझी सल्ला व मदत तुह्माला पाहिजे आहे.

**तुवर**—कांहीं अंशीं तुमचा तर्क खरा आहे; परंतु हें पहा, हा विषय पडला बराच नाजूक. तुमचा माझ्याशीं अकृत्रिम स्नेहभाव आहे हें जरी सत्य आहे, तरी देखील अशा प्रकारच्या सल्लामसलतींत जास्त खबरदारी घेणें जरूर आहे. यास्तव, आपण आपली तरवार हातांत घेऊन शपथ वाहूंया कीं ‘ आज या ठिकाणीं जें कांहीं आपण बोलूं अथवा जो कांहीं बेत करूं त्याची परिस्फुटता कधींहि करणार नाहीं! ’ ( तसें करितात. ) आतां माझ्या डोक्यांतील विचार व त्याला अनुरूप असा माझा कार्यक्रम तुमच्यापुढें मांडतों, व तुह्मींहि तसेंच मन मोकळें करून आपले विचार मला कळवा. समजा, ह्या हकीमाच्याऔषधानें हा संग्रामसिंह बरा झाला, तर आपणा स्वतःला ती गोष्ट कितपत फायदेशीर आहे ?

**जैतसिंग**—व्यक्तिदृष्ट्या ह्मणण्यासारखा फायदा नाहीं; परंतु एकंदरीनें पाहिलें असतां व्रजभूमीच्या उद्धारासंबंधीं हल्लीं दिसत असलेली निराशा बऱ्याच अंशीं नाहींशी होईल.

**तुवर**—जैतसिंग! एकंदरीनें विचार करण्याची वेळ आतां गेलीच ह्मणून समजा! व्रजभूमीचा उद्धार, लढाई, जय, इत्यादिकांचा पोकळ भ्रम, व उदात्त विचार यांविषयींची ती आरंभींची प्रचंड लाट आतां पार निघून गेली, व प्रत्येक व्यक्तीच्या अंगचे आपमतलबीपणा, महत्त्वाकांक्षा, परोत्कर्षासहिष्णुता इत्यादि मुळचे गुण आपल्या खऱ्या स्वरूपानें व्यक्त झाले आहेत. हे मोठमोठे राणे-महाराणे निवळ आपल्या स्वतःपुरतेच पहाणार. तुमच्याआमच्यासारख्या ठाकरांनां व मानकऱ्यांनां कोणीएक विचारणार नाहीं. आज यांच्या बरोबर हातावर शिर घेऊन लढाईला तयार व्हा, यःकश्चित् गोष्टींत देखील यांचीं मर्मभेदक भाषणें सहन करा, व उद्यां काम झालें कीं हात हालवित आलां तसे चालते व्हा!

यदाकदाचित् लढाईंत यश आलेंच, तर ही व्रजभूमि व हा मुलूख हे एकाहून एक रथी महारथी आपापसांत वांटून घेतील त्यावेळीं तुमच्याआमच्या पराक्रमाची यांनां आठवणसुद्धां रहाणार नाहीं. एवढ्याचकरितां मी ह्मणतों कीं, जर ह्या पुढें होणाऱ्या गोष्टी आतांच दिसत आहेत, तर आपण वेळींच सावध कां होऊं नये ? वास्तविक पाहतां, या मोहिमेची आजची स्थिति अशी आहे कीं, एखाद्या क्षुल्लक कारणावरून देखील या राजसमूहांत भयंकर तंटा माजून जो तो आपापल्या घरचा रस्ता सुधारील. ह्मणजे यांच्यांत एकदिली होवो वा बेदिली होवो, आह्मांला फायदा कोठूनच नाहीं ! यासाठीं मी ह्मणतों कीं, जेणेंकरून आपला फायदा होईल, असाच मार्ग आतां स्वीकारला पाहिजे.

**जैतसिंग**—आपण ह्मणतां यांत पुष्कळ तथ्य आहे; परंतु तें जुळून यावें कसें ? त्या हकीमाचे औषधानें राण्याची प्रकृति जर या घटकेस बरी झाली, तर तो लढाईचें शिंग तावडतोब फुंकील, व मग आपणा सर्वांस निमूटपणें त्याच्या मागोमाग जावें लागेल, आणि हे तुमचे विचार मनांतले मनांत राहतील.

**तुवर**—हें पहा, अगोदर तर महाराणा ह्या हकीमाच्या औषधानें बरा होत नाहीं. आणि समजा त्यांतूनहि बरा झालाच, तरी लढाई तावडतोब सुरू होणें अगदीं अशक्य आहे. कारण, राजमंडळाची स्थिति कशी आहे हें तुह्मी जाणतांच. कोणत्याहि रीतीनें कायमचा तह जुळवून आणण्याचा त्यांचा पक्का निश्चय झाला आहे. शिवाय, या घटकेपासून हा सिलैदि तुवर संग्रामसिंहाचा कट्टा वैरी झाला, असें तुह्माला स्पष्ट सांगतों. इतक्या निकराला गोष्टी जाण्याचें कारण काय, हें तुह्माला सांगण्याची जरूर नाहीं. पहा, आज आपण त्याच्या समाचाराला गेलों. आपले तत्संबंधीं कोणतेहि उद्देश असोत, परंतु तेथें गेल्यासारखा कांहीं मानमरातब तर खरा ! पण त्याऐवजीं तीं मर्मभेदक कठोर भाषणें ! छे, छे, हा उन्मत्तपणाचा कळस झाला, आणि याबद्दल राण्याचे डोळ्यांत चांगलें चरचरीत अंजन घातलें पाहिजे. ( थांबून ) तें पहा, त्याचें निशाण त्या बजरंग टेंकडीवर सर्वांत उंच ठिकाणीं फडकत आहे. जसें कांहीं–इतर सर्व राणे त्याचे मांडलीकच आहेत! आतां या गोष्टीकडे विशेषसें कोणाचें लक्ष्य जात नाहीं हें खरें; पण त्यांतील मर्म जर का या राजसमूहांतील एखाद्याच्या लक्ष्यांत एक वेळ आलें, तर तेवढ्यावरूनच आतां सांगितल्यासारखा भयंकर तंटा एकदम माजेल, व पुन्हा सख्य होणें दुरापास्त होईल. जैतसिंगजी ! ध्यानांत आणा कीं, या गोष्टीवरच माझा सर्व व्यूह रचलेला आहे. आपले जयपुरचे राणा गजसिंग ह्मणजे अकलेचे

केवढे खंदक आहेत, हें आपण जाणतच आहों. दारूचा अम्मल एकदा चढला कीं, उद्यां रात्रौ स्वारींनां देतों चिथावून ह्मणजे काम झालेंच ह्मणून समजा! हां, हां ह्मणतां सर्व फौजेंत दंगा उडून जाईल!

**जैतसिंग**—वा! युक्ति तर खाशी व सुसाध्य आहे; परंतु याशिवाय आणखी एक गोष्ट आपल्या राजसमूहांत हल्लीं घाटत असून तिचा रोंख राण्याची फटफजिती उडविण्याचाच दिसतो!

**तुवर**—ती कोणती बुवा? मीं नाहीं अझून ऐकिली!

**जैतसिंग**—नुकतीच राजसमूहाची जी बैठक झाली, तींत बादशहाशीं तह करण्यासंबंधीं खल चालला होता. खुद्द बादशहानें तहासंबंधीं ज्या अटी पुढें आणिल्या आहेत त्यांत अशी एक अट आहे कीं, जर महाराणा संग्रामसिंह आपली बहीण कमलावती हिचा विवाह शहाजादा हुमायून याशीं करून देईल, तर ही व्रजभूमिहि बिनतक्रार रजपुतांचे स्वाधीन करण्यांत येईल. आतां ही अट, मानी महाराणा संग्रामसिंह आपखुषीनें कधींहि कबूल करणार नाहीं हें जरी खरें आहे, तरी हल्लींची परिस्थिति मनांत आणितां त्याला दुसरी तोड नाहीं. करितां कसेंहि करून राण्यानें ही अट कबूल करावी, व हा सर्व बखेडा मोडून आपल्या राज्यांत परत जावें, अशाविषयीं त्याला भाग पाडण्याकरितां खटपटी सुरू आहेत.

**तुवर**—वः! आतां तर जोडगोळी झाली! कोणतीहि एक जरी लागू पडली, तरी आपला कार्यभाग खात्रीनें साधलाच पाहिजे! बरें तर चला. राणा संग्रामसिंहाची काय हालहवाल आहे याची उगाच चौकशी करून पाहूं.

[ जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—राणी कर्णावतीचें शिबिर. कर्णावती व कमलावती सिंहासनावर बसल्या आहेत. जवळ दासीमंडळ, वेताळ्या व आणि सटवाई यांचें जोडपें उभें आहे, असा प्रवेश. ]

**राणी**—कायग रामप्यारी! स्वारीकडील कांहीं ताजी बातमी कळली का? आज पंधरा दिवस झाले, अझून ताप मेला कसा तो हटत नाहीं! नवस झाले, सायास झाले, उपासतापास सगळं कांहीं झालं, पण देवाला अझून करुणा ह्मणून येत नाहीं! ( पदरानें डोळे पुसते. )

**रामप्यारी**—बाईसाहेब, अशा घाबरूं नका. आतांच हा वेताळ्या सांगत होता कीं, कोणी एक हुशार वैद्य येऊन त्यानं सरकारस्वारींनां औषध दिलं आहे, व त्यानं राणाजींनां गाढ झोंप लागली आहे.

**राणी**—कारे वेताळ्या, कोणरे वैद्य आहे हा ?

**वेताळ्या**—ह्यो, वैद व्हय ? बेस ! पन हे पघा माईसाब, त्यो वैद मानूसबी नव्ह, आन् ढोरबी नव्ह ! मानूस ह्मनाव तर माझ्या मावशाच घरच्या एडक्यापूनबी लांबलचक–अक्षी तीन वांव दाडी हाय पघा त्येला ! ढोर समजाल तरींबी दुसरीच पंचात! त्येच डोकंबी तसंच तीन मुडे उंच, त्येच्यावर उभ राहील तर माझ्या परानपियेंच्या मायच्या घरामागल्या गोठ्यांतल ढोरानढोर मोजतां येईल.

**कमलावती**—काय मेला चारगट आहे पहा ! नीट चांगलं सांगायचं सोडून कांहींच्याबांहींच चऱ्हाट वळतो आहे !

**वेताळ्या**—हायच तस त्ये ! त्येच्या अक्षी वावभर लांब दाढीच चऱ्हाट वळल तर त्येचीबी धापांच दावी होतील, पन ह्ये पघा, त्येच्या संगात आनखी योक मनुक्ष्य व्हता, त्यो मातर माझ्या ध्येनामंदी बराबर उतरला.

**रामप्यारी**—तो रे कोण ?

**वेताळ्या**—त्यो–त्या राती मठांत चोरावानी आला व्हता त्यो !

**कमलावती**—कायरे, काय चहाटळपणा चालवला आहे हा ?

**रामप्यारी**—वेताळ्या, हें बघ, लवकर सांग कोण होता तो ? करणसिंग कारे ?

**वेताळ्या**—त्येच नांवगांव न्हाइ मासनी ठाव. ज्येचं त्येसनी घ्याव पुसून !

**रामप्यारी**—बरं मग—

**वेताळ्या**—आन् त्येच्या संग त्यो दाडीवाला. घेतोया महाराजास्नी औषीद. व्हत्याल ब्येस.

**रामप्यारी**—ह्या मेल्यापासून कांहीं नीट समजायचं आहे !

**कमलावती**—कसं समजेल ? त्यांनां ठेवलीं आहेत वाटेल तशीं चढवून ! हेंच पहिल्यापासून पायांतलं खेंटर पायांत असलं ह्मणजे सर्व कांहीं यथास्थित होतं. जाग जवाहीर ! जा, महाराणाजींच्या डेऱ्यावर, अन् पाहून नीट चवकशी करून ये माझ्या तंबूकडे. मी अमळशानं तिकडेच जाणार आहें. ( जवाहीर जाते. ) वेताळ्या ! जा इथून, तुझ्या सटवीला घेऊन काळं कर ! हो चालता बाहेर.

हें पहा वहिनी! हें भुतांचं जोडपं आपल्याला जरी प्रिय असलं, तरी मला इथं जेव्हां बोलावशील, तेव्हां ह्यांनां बाहेर हांकून देत जा.

( राणी वेताळ्यास बाहेर जाण्याची खूण करिते. )

**वेताळ्या**—चाल माजी रानी! वाईच फेरफटका करूनशान् आपल्या राज्याचा अक्षी कडेकोट बंदोबस्त लावून येऊं.

[ जातात.

**राणी**—वन्सं खरंच, आपण इतक्या रागावलांत कां बरं ?

**कमलावती**—ह्या यःकश्चित टारगटांनींसुद्धां माझी चेष्टा करावी का ?

**राणी**—तें जाऊंद्या आतां. पण खरंच गडे! करणसिंगाची अन् तुमची अगदीं बरोबर ओळख पटली का ?

**कमलावती**—( स्वगत ) कशी खोंचून विचारते आहे! (उघड) वहिनी! तुझं किनई कांहीं तरीच विचारणं, अन् नसती चवकशी!

**राणी**—तिकडून तर बाई त्याच्या शौर्याची नेहमीं तारीफ होत असते; पण त्यांच्या अंगीं शौर्य जसं पुष्कळ आहे तशीच संपत्तिहि विपुल असती, तर फार चांगलं झालं असतं.

**कमलावती**—कां बरं ? तुह्माला कां त्याच्या गरिबीची इतकी कींव आली ?

**राणी**—अबबब!!! त्याची गरीबी काढल्याबद्दल वन्संनां केवढा राग आला पण ? आह्मी नाहीं हो बाई बोलत, ज्याचं त्याला पसंत असलं ह्मणजे झालं!

**कमलावती**—हें कायग तुझं वहिनी! जेव्हांतेव्हां तुझं बोलणं ह्मटलं ह्मणजे असं कुजकं! बऱ्या बाई तुला लोकांच्या पसंत्या अन् नापसंत्या कळतात.

**राणी**—वन्सं, तें तुमचं लप्पंछप्पं आतां ठेवा सगळं गुंडाळून! स्वारींच्यासुद्धां ध्यानांत येऊन चुकलं आहे कीं, आमच्या वन्सं आज नाहीं उद्यां त्या करणसिंगाच्या पट्टराणी होणार! आह्माला तरी प्रथम प्रथम आश्चर्य वाटे, कीं एवढाल्या मोठमोठ्या मागण्यांवर मागण्या येतात, अन् त्यांतली एकसुद्धां यांनां कबूल होत नाहीं, यांतलं इंगित तरी काय ? तें इंगित एकदाचं उकललं. कांग रामप्यारी! कशी कायग मजा ती त्या मठांतली ? सांग बरं आणखी एकदा—

**कमलावती**—( स्वगत ) ह्याच सटवीनं पाहिलं वाटतं! पण काय हरकत आहे!

**रामप्यारी**—बाईसाहेब, ती माळेंतल्या फुलांची गोष्ट होय ? नको बाई, ताईसाहेब रागावतील!

**कमलावती**—हें पहा, मला त्याचा मुळींच राग नाहीं. जो प्रकार तूं पहिला असं ह्मणत्येस, तो बुद्धिपुरःसरच झाला होता.

**राणी**—तें सगळं आलं ध्यानांत; पण ह्मटलं, उसांत जाऊन वाढंच शोधून काढलंत बरंका. तुह्मी कांहीं ह्मणा, पण तुमची निवड कांहीं आपणाला पसंत नाहीं!

**कमलावती**—ह्मणजे, तूं काय ह्मणत्येस हें मुळींच मला कळत नाहीं! ते गरीब आहेत एवढ्यावरच तुझा कटाक्ष कीं नाहीं ?

**राणी**—ते किनई मोठे गर्भश्रीमंत आहेत हो! काय वन्सं तुह्माला आवडला असेल तो असो! अंगावर घालायला चांगलेसे कपडेसुद्धां त्याला मिळत नाहींत. तशीच ती त्याची रहाण्याची जागा! एका अंगाला तीन दगडांची चूल, दुसऱ्या कोपऱ्यांत पाण्याचीं दोन मडकीं, तिसरीकडे गवताचा एक छपरी पलंग, त्रसायउठायला शिकारींत मारलेल्या जनावरांचीं कातडीं, अन् नोकरचाकरांच्या ऐवजीं तो एक लठ्ठया कुत्रा. ह्या असल्या थाटमाटांत आमच्या वन्सबाई कशा संसार करतील त्या करोत!

**कमलावती**—वहिनी, तूं आहेस मानानं माझ्याहून वडील; तेव्हां तूं कशी जरी थट्टा केलीस अन् ती कोणत्याहि उद्देशानं केलीस, तरी ती मनावर घेणं मला रास्त नाहीं. बाकी, तुझ्या आतांच्या बोलण्यांतलं तथ्य जेवढं आहे त्याचा विचार करितां तुझ्या माझ्या मतभेदाचं कारण तेंच आहे हें तुला सांगत्यें. तुला असं वाटतं कीं, स्त्रीपुरुषांचं एकमेकांवरील प्रेम उंची कपड्यालत्त्यांत, मौल्यवान दागदागिन्यांत, मोठमोठ्या महालांत, ऐश्वर्यदर्शक सर्व चीजवस्तूंत व भपकेदार अघळपघळ भाषणांत भरून राहिलेलं असतं. पण हा समज अगदीं चुकीचा आहे. आतां माझ्या ह्मणण्याला कांहीं अपवाद आहेत, हें मी जाणून आहें. पण तुला खात्रीनं सांगत्यें कीं, खऱ्या प्रेमाला राजवाडा व भिकाऱ्याची झोंपडी हीं दोन्हीं सारखींच आहेत! श्रीमंत काय, अन् गरीब काय, उभयतांची प्रीति करण्याची तऱ्हा अगदीं सारखीच असते. किंबहुना गरिबांच्या प्रीतींतच समत्व व सत्यता जास्त सांपडेल. शिवाय, श्रीमान् लोकांच्या घरांतून प्रेमाची जी हिडीस थट्टा झालेली पुष्कळ वेळां दिसते, ती मात्र गरिबाच्या झोंपडींत कधींहि दिसायची नाहीं! ढोंग हें कधींहि तिथं सांपडायचं नाहीं.

**राणी**—वन्सं, तुमची विद्वत्ता आमच्या अंगीं नाहीं, ह्मणून तुह्मी ह्मणतां तें आमच्या डोक्यांत शिरत नाहीं. आह्मी आपलीं धोपटमार्गी माणसं. जें चारचौघांत

बरं दिसेल तें बोलावं अन् करावं. माझं ह्मणणं एवढंच कीं, तुमच्या कल्पनेप्रमाणंच तुमच्यावर अंतःकरणापासून प्रेम करणारा आणि शिवाय श्रीमान्, उच्च कुलांतला व करणसिंगाप्रमाणंच शूर असा तुमच्या योग्य दुसरा वर मिळालाच नसता, असं कांहीं नाहीं.

**कमलावती**—हें पहा, प्रीति ही अशी कांहीं एखादी वस्तु नाहीं, कीं तिचं हवं तसं स्थलांतर करितां येईल! ती ज्या एका ठिकाणीं एकदा रमली, तें ठिकाण मग कसलंहि असो, तिचा सोक्ष किंवा मोक्ष तिथंच व्हायचा! आतां ज्या दोन मनांला प्रेमाचं बंधन बसलं, तींच दोन मनं अन्य कारणांमुळं लग्नविधीनं बांधलीं जात नाहींत हें आपण पहातों. तद्वतच, ह्या गोष्टींतहि उच्च, नीच कुलाची आडकाठी उभी राहिल्यास जन्मभर अविवाहित रहावं लागेल, इतकंच कीं नाहीं! चालेल. विवाहबंधनं जुळलीं नाहींत तरी प्रेमबंधनं कधीं तुटत नसतात. शिवाय, ह्या इथं जमलेल्या व कांहीं भागुबाईप्रमाणं लढाईवर न येतां आपल्या घरींच राहिलेल्या आडनांवाच्या शूर वीरांची जर मजजवळ प्रतिष्ठा सांगत असशील, तर तुलाच ह्मणून सांगत्यें कीं, यांचं शौर्य व कार्यदक्षता, करणसिंगाच्या शौर्याच्या व कार्यदक्षतेच्या पासंगासहि लागायची नाहीं! पहा, ही वेळ कसली! व्रजभूमीच्या उद्धारासारख्या पारमार्थिक कामाबद्दल यवनांशीं लढाई करण्याकरितां जमा झालेले हे वीर पुरुष जर आपल्या शारीरिक सुखाकडेच पहात बसतील तर त्यांनां वीर ह्मणणंसुद्धां चुकीचं होईल. लष्करी कामगिरीच्या टापटिपीपुढं ज्याला स्वतःच्या कपड्यालत्त्याची टापटीप व चैन सुचत नाहीं, वेळीं अवेळीं मिळणारी नुसती जाडीभरडी चटणीभाकरहि ज्याला पंचपक्वान्नांहून जास्त मिष्ट लागते, नुसत्या दगडावर किंवा गवतावर निजून दैववशात् शिकारींत मारलेल्या जनावराचं एखादं कातडं मिळाल्यास तेवढ्यावर थंडीचा गुजारा करून ज्याला उंच उंच पराच्या बिछान्यावर निजल्याप्रमाणं सुख होतं, तोच ह्यावेळीं खरा वीर, खरा कळकळीनं काम करणारा समजला पाहिजे. ज्याच्या गरिबीचं तूं एवढं मोठं प्रदर्शन आतां मांडलं होतंस, तो या न्यायानं कोणत्या स्थितीला पात्र आहे याचा विचार कर, ह्मणजे झालं.

**राणी**—वन्सं, करणसिंग मोठे शूर आहेत व तसेच कामांतहि मोठे दक्ष असतात, हें मींहि ऐकलें. पण तुमच्या ह्मणण्याप्रमाणंच पहायला गेलं तर दुसऱ्या इतर गोष्टींतहि पुष्कळ वेळ मन गुंतल्याचा दोष त्यांच्या कपाळीं लागतो हें येतंना ध्यानांत?

**रामप्यारी**—वः ताईसाहेब ! इतक्या गोष्टी सांगून शेवटीं गळ्यांत घोंगडं घेतलंत हो घेतलंत !

**कमलावती**—घोंगडं कशाचं अन गळ्यांत काय घ्यायचं ! सर्व कांहीं मला समजतं. पण पक्कं ध्यानांत ठेवा कीं, त्यांची मजवर कितीहि प्रीति असली तरी ती त्यांच्या लष्करी कामगिरींत कधींहि आड येणार नाहीं ! उलट, प्रीतिजन्य भावी सुखाच्या आशेवर ते आपली कामगिरी जास्त उल्हासानं करितील !

**राणी**—वन्सं, तुमचं सर्व मीं ऐकून घेतलं, पण हें मात्र नाहींहो ऐकायची ! ह्मणे, हा आपल्या लष्करी कामगिरीची कधींहि हेळसांड करणार नाहीं ! पैज तुमची आमची ! आह्मीं कांहीं युक्ति करून जर तुमचं ह्मणणं खोटं पाडलं तर तुह्मीं आपली ती माणकाची आंगठी हरावी, अन् आमच्या हातून जर तसं झालं नाहीं तर हें हातांतलं कंकण आह्मी हरूं. आहे कबूल ?

**कमलावती**—कबूल नाहीं नी कांहीं नाहीं ! आधीं पैजा मारणं हेंच वाईट. तशांत, माझ्यासारख्या कुमारिकेला अशा भलत्याच बाबतींत पैज मारणं अगदींच अयोग्य.

**राणी**—कां ? आंगठी जाईल ह्मणून भितां वाटतं ?

**कमलावती**—असं का तुला वाटतं ! ( आंगठी काढून ) ही घे, पाहिजे तर, अगोदरच कां घेईनास ? तिचीग काय मोठीशी किंमत ! ( राणी आंगठी घेते. ) पण मी नाहीं बाई असली पैज मारणार ! चल मला जाऊंदे. राणाजींकडील काय हकीगत आहे ती ऐकूंदे अगोदर.

**राणी**—( पुढें येऊन ) थांबा हो पण, आह्मीसुद्धां येतों. पैज मेली हरली तर हरली, त्याच्याबद्दल एव्हांपासून कां मागं घेतां ! ( कमलावती जाते. ) आमच्या वन्संचा तोराच मोठा. एक चकार शब्दसुद्धां दुसऱ्याला बोलूं देत नाहींत. थांबा ह्मणावं, अशी खोड मोडत्यें कीं, पुन्हा नाकच वर करूं नये ! ही आंगठी आपल्या हातीं आली, हेंहि चांगलंच झालं. पहात्यें आतां माझ्यांत कांहीं करामत आहे कीं नाहीं !

[ सर्व जातात.

---

## प्रवेश तिसरा.

[ **स्थळ**—जयपुरचा राणा गजसिंग याचें शिबिर. तंबूत राणा, विदूषक, गप्पीदास वगैरे यथास्थानीं बसले असून कांहीं सेवक उभे आहेत, असा प्रवेश. ]

**गजसिंग**—या सर्व असे समोर. आज आपल्या येथें राजा सिलैदि तुवर आणि राव जैतसिंग आदिकरून बडी बडी मंडळी मेजवानीला बोलाविली आहे, तेव्हां व्यवस्था अगदीं चोख ठेविली पाहिजे. सामानसुमान पहिल्या प्रतीचें; कपडेलत्ते अगदीं भरगच्ची. मुदपाक, फळफळावळ, अगदीं इरसाल; द्राक्षासव अगदीं उत्तमांतला, खूप स्वादिष्ट, आणि प्रत्येकाला इतका आग्रहपूर्वक वाढला पाहिजे कीं, जयपुरवाल्यांच्या पाहुणचाराची आठवण पाहुण्यांच्या मनांत कायम राहिली पाहिजे! नाहीं तर या चितोरवाल्या संग्रामाचे घरचा पाहुणचार! स्वत: एक पेल्यावर प्यायचा नाहीं अन् दुसरे जास्त प्यालेले खपणार नाहीं. हा कंजूषपणा काय कामाचा!! मारे सुरयांवर सुरया रिकाम्या झाल्या पाहिजेत, समजलें! तसेंच, आपल्या राजकीय थाटांत आणि गौरवांत बिलकुल कमी पडूं देऊं नका. वाढपी लोकांचे पोषाख भरजरीचे असावे. मेजवानींत वापरण्याचीं भांडीं सोन्याचीं आणि चांदीचीं असावीं. व खुद्द आह्माला वाढते वेळीं वाढप्यांनीं मोठ्या अदबीनें मुजरा करून वाढलें पाहिजे. इतरांनां फक्त लवून पण किंचित् ताठ्यानें वाढावें. धोरण इतकेंच ठेवायचें कीं, जयपूरच्या सार्वभौमत्वाचा मानमरातब सर्व गोष्टींत कायम ठेवून बाकी कसेंहि अघळपघळ वागलें तरी चिंता नाहीं. जा, लागा आपापल्या कामाला. मीं सांगितलेल्या गोष्टी कशा वठवितां हें पहातों. ( नोकर जातात व व्यवस्थेला लागतात; परंतु सर्व गोंधळ करितात. ) कां गप्पीदास, मी ह्मणतों हें बरोबर आहे कीं नाहीं ?

**गप्पीदास**—अगदीं बरोबर! जयपूरच्या कारभारांतील अघळपघळपणा इतर कोठेंहि सांपडणार नाहीं!

**विदूषक**—मेजवानींत आणि त्यांतल्या त्यांत द्राक्षासव स्वतः पिण्यांत व इतरांनां पाजण्यांत आपल्या सरकारचा हात धरणारा सर्व राजमंडळांत एकहि सांपडणार नाहीं! ( चोपदार प्रवेश करून तुवर, जैतसिंग आदिकरून मंडळी आल्याची वर्दी देतो. )

**गजसिंग**—जा, त्यांनां एकदम आंत घेऊन ये. अरे ए जा, त्या गाणार मंडळीला बोलवा. मारे रंगीरंग उडाला पाहिजे. ( मंडळी येऊन आसनांवर बसते. )

**जैतसिंग**—( बाजूस तुवराला ) काम मोठ्या झोंकानें झालें पाहिजे!

**तुवर**—तुह्मीं आरंभ केलात कीं मी री ओढतोंच!

**गजसिंग**—कां तुवरराज! कांहीं राजकीय गोष्टींचा खल चालला आहे वाटतें? छे बोवा, निदान माझ्या घरीं तरी याला रजा द्या, आणि चार घटका गमतींत घालवूंया.

**तुवर**—छे, छे, भलतेंच! मी फक्त इतकेंच ह्मणत होतों कीं, ह्या थाटमाटानें आमच्या डोळ्यांचें पारणें फिटत आहे.

**जैतसिंग**—शिवाय, ही गोष्ट ध्यानांत आणा कीं, मोहिमेच्या ठिकाणीं जर हा ऐषआराम, तर खुद्द राजधानींत काय स्थिति असेल!

( भोजनाचीं पात्रें येतात. जेवणानंतर दारूचा आग्रह होतो, व तुवर, जैतसिंग खेरीज करून सर्व धुंद होतात. )

**विदूषक**—चालूंद्यारे आतां तुमचें कवित्व! एकेक चुटका पण नमुनेदार पाहिजे!

**पहिला भाट**—( मुजरा करून दोहा ह्मणतो. )

तरनि जगत जलनिधि तरनि जै जै आनंद ओक,
कोक कोकनद सोकहर लोक लोक आलोक. १

राजत है दिनराजको वंस अवनि-अवतंस,
जामै पुनि पुनि अवतरे कंस मथन प्रभु-अंस. २

महावीर ता वंसमै भयो एक अवनीस,
लियौ विरद सिसौदिया दियो ईसकों सीस. ३

**दुसरा भाट**—( सवैया ह्मणतो. )

देत तुरी गुन गीत सुने विन देत करी गुन गीतं सुनाये,
सेवक भावत भूपन आन जहान खुमानकि कीरति गाये;

मंगनको भुवपाल घनै पैं निहाल करै संगराज रिझायै,
और रितैं बरसै सरसैं पै वढै नदिया नद पावस आयै. १

**तुवर**—खरें आहे बाबा. ह्या पृथ्वीवर राणा संग एक अवतारी पुरुष आहे खरा.

**पहिला भाट**—( सवैया ह्मणतो. )

दीन दयाल दुनी प्रतिपालक जे करता निरम्लेंच्छ महीके,
सेवक भूधरि उद्धरिवो सुनै और जिते गुनके सब जीके,
या कलिमैं अवतार लियो तउ तेइ सुभाव संग्रामबलीके,
आइ धऱ्यो हरि तैं नररूप पै काय करै सिगरे हरिहीके. १

**गप्पीदास**—अरे आतां एखादा रणमैदानावरचा देखावा येऊं द्या.

**दुसरा भाट**—( छप्पै म्हणतो. )

लिए धरि सुहकमसिंह कहे अरु किसोर नृपकुम्भ,
संगराज संग्राम किय भुम्मम्मधि करि धुम्म !
भुम्ममधि करि धुम्ममडि रिपु जुम्ममलि करि,
जंगग्गर जिउ तंगग्गर वमतंगग्गन हरी,
लक्खक्खन रन दक्खक्खलनि अ लक्खक्खित भरि,
मोल्लहि जसु नोल्लरि वहलोल्लिय धरि, १

**पहिला भाट**—

मुंड कटत कहु रुंड नटत कहु सुंड पटत घन,
गिद्ध लसत कहुं सिद्ध हंसत सुखविद्धि रसत मन;
भूत फिरत करि वूत भिरत सुरदूत विरत तहं,
चंड नचनि गनमंडि रचति धुनि डंडि मचति जहं. १

**तुवर**—( कुचेष्टेनें ) काय मजा आहे पहा जैतसिंग! या मोहिमेंत जे जे प्रसंग झाले, त्यांत संग्रामसिंहाशिवाय कोणींच पराक्रम दाखविला नाहीं काय ?

**जैतसिंग**—अगदींच झूट! संग्रामसिंहानें पराक्रम गाजविला, तसा आणखी अनेकांनींहि आपापल्यापरी गाजविला. ही गोष्ट प्रत्यक्ष त्यालाहि कबूल करावी लागेल.

**तुवर**—तुह्मीं वाटेल तर तसा समज बाळगा; परंतु माझा नाहीं त्यावर भरवंसा. कारण, हें पहा, जो उठला तो एकट्या संग्रामसिंहाचीच तारीफ करित सुटतो. गवयास गाण्यालासुद्धां दुसरा विषय नाहीं!

**गजसिंग**—काय, या मोहिमेंत आह्मीं कांहींच केलें नाहीं ? कित्येक प्रसंगीं जिवाची पर्वा न बाळगतां शत्रूंवर तुटून पडलों तें सर्व व्यर्थच !

**जैतसिंग**—गजसिंगजी ह्मणतात हें अगदीं सत्य आहे !

**विदूषक**—( बाजूस ) आमच्या महाराजांवर ज्या लढाईंत जिवावरचा प्रसंग आला नाहीं अशी लढाईच झाली नाहीं !

**जैतसिंग**—( गाणाऱ्यास ) कायरे, तुमच्या मंडळींत असा नाहीं का कोणी, कीं, जो या पराक्रमी राणा गजसिंगजींवर दोन फरमाशी चुटके गाऊं शकेल ?

**तुवर**—खूप शकल काढिली !

[ भाट पुन्हा ह्मणूं लागतात. ]

**पहिला भाट**—

को कविराज विभूषन होत विना कवि साहितनैको कहायै,
को कविराज सभाजित होत सभा सरजाके विना गुन गायै;
को कविराज भुवालनि भावतु जैपुरनाथ मनमैं विन भायै,
को कविराज चढै गजराज गजसिंगकी मौज मही वितु पायै.

( सर्व मंडळी वहावा करितात. )

**दुसरा भाट**—

'जिन फन फूतकार उडत पहार भार कूरम कठिन पीठ कमल विदलिगो,
विषजाल ज्वालामुखी लवलीन होत जिन झारन चिक्कार दिग्गज मद उगलिगो,
कीन्हो जिहिपान पयपानसो जहान कुल कूरम उछलि जलसिंधु खल हलिगो,
खग्ग खग्गराज महराज गजसिंगको अखिल खलनाग झुगलदल निगलिगो. १

**गप्पीदास**—समजलांत तुवरराज ! आमचे राणा गजसिंग ह्मणजे गरूड आहेत गरूड ! आणि इतर सर्व राजे ह्मणजे केवळ नाग-सर्प, उर्फ माझ्या मतें गांडुळें ! महाराज गरुडाशीं स्पर्धा करण्याची कोणाची छाती नाहीं, आणि ह्मणूनच आमच्या जयपूरच्या निशाणावर त्यांची योजना झालेली आहे !

**तुवर**—अहो तें खरें, पण त्याचा उपयोग काय ? अलीकडच्या काळांत सिंहानें गरुडापेक्षांहि उंच उड्डान केलें आहे.

**गजसिंग**—( लाल होऊन ) काय ?

**विदूषक**—तुवरराज ! सिंहाला पंख नसतात !

**तुवर**—अहो तेंहि खरें, पण ते सिंह जुन्या काळचे, तेव्हां बिनपंखाचे सिंह असत. पण चितोडच्या सिंहाला अलीकडे खूप मजबूत पंख फुटले आहेत, व त्यामुळें तो पशु, पक्षी, व जलचर या सर्वांचा राजा होऊन त्याच्याशीं बरोबरी करणारा कोणी राहिला नाहीं !

**गजसिंग**—( अम्मल चढून राग अनावर होतो ) काय, आपखुशीनें या धर्मयुद्धांत सामील झालेल्या आह्मां स्वतंत्र राजांनां संग्रामसिंह आपले गुलाम समजतो काय ?

**तुवर**—तें मीं कसें ह्मणूं! पण वस्तुस्थितीवरून पहातां तसें दिसतें खरें. तें पहा त्याचें निशाण, बजरंग टेंकडीवर सर्वांत उंच अशा ठिकाणीं कसें फडकत राहिलें आहे! जणूं काय, या सर्व रजपुतसैन्यांत त्याच्या इतका श्रेष्ठ कोणीच नाहीं! पण ह्या गोष्टीचा मला एकट्यालाच राग येऊन काय फायदा? मारवाडचे सुज्ञ, प्रतापी व वयोवृद्ध राणा मेघसिंह, तसेंच जयपुरचे महान् बलाढ्य राणा गजसिंगजी यांच्यासारखे वीर महावीर जेथें माना खालीं घालून अपमान सहन करितात, तेथें मजसारख्या साधारण प्रतीच्या मांडलिकांची काय कथा?

**गजसिंग**—मेघसिंहाला मीं पुष्कळ वेळां सांगितलें कीं, संग्रामसिंहाच्या अरेरावीला आळा घातला पाहिजे; पण त्याचें सर्वच काम ढिलेपणाचें. ह्मणे, असल्या क्षुल्लक गोष्टीसाठीं तंटा करण्याची ही वेळ नव्हे!

**तुवर**—राणा मेघसिंहाच्या ह्या नम्र वृत्तींत कांहीं राजकारस्थान व धोरण असलें पाहिजे, असें लोक अनुमान करितात; परंतु आपण जी ही हार खाल्या-सारखी दिसते, यांतील उद्देश मात्र आमच्या ध्यानीं येत नाहीं.

**गजसिंग**—मीं हार खाल्ली? नांव सोडा! ही गोष्ट कालत्रयीं घडणार नाहीं. माझा हक्क मला कितपत बजावतां येतो, हें या क्षणीं रजपूत सैन्याला दाखवून देतों. (आपलें निशाण घेतो) चला, उठा, सर्व मंडळी! आपल्या गरुडाला अशा उंच ठिकाणीं नेऊन बसवा, कीं, जेथून तो सर्व सैन्याच्या दृष्टीस पडेल. (जाऊं लागतो.)

**तुवर**—(त्याला अडवून) हें पहा राणाजी! थोडे थांबा. अशा वेळीं आपण हें कृत्य केल्यानें छावणींत जर कांहीं दंगा झाला तर आपल्या कीर्तीला बट्टा येईल. यासाठीं आजपर्यंत जसे आपण राणा संग्रामसिंहांशीं नम्रपणानें वागत आलांत, तसेंच आणखी कांहीं दिवस चालूं द्या.

**गजसिंग**—कांहीं दिवस? एक पळहि नाहीं सहन होणार! आत्तां जाऊन त्याच्या निशाणाचे धुडके उडवितों, आणि हें निशाण त्याच्या जागीं फडकावितों.

[ त्वरेनें जातो. तुवर व जैतसिंग वगैरे मागें रहातात.

**तुवर**—(पुढें येऊन) छे छे, गजसिंग फार अविचार करित आहेत. याचा परिणाम कांहीं तरी भयंकर होईल. चला तुह्मी सर्व त्यांच्यामागें.

[ गजसिंगाचे लोक जातात.

**जैतसिंग**—वः बहाद्दर! बीजारोपण तर नामी झालें!

**तुवर**—तें खरें, पण यापुढें त्याला जोम कितपत मिळतो हें पहाणें आहे. आतां अगोदर तुह्मी राजमंडळाला जागृत करा. मारवाडचा राणा वृद्ध कपि

मेघसिंह असल्या प्रसंगासाठीं कित्येक दिवसांपासून टपून बसला आहे, त्याला भेटा. पोक्त भाषणाचें अवडंबर उठवून संगाला चीत करून स्वतःची लब्धप्रतिष्ठा स्थापित करण्याला हा कपिलाषष्ठीचा योग आला आहे, असें त्याला खास वाटेल !

**जैतसिंग**—त्या जवान पठ्ठ्या हनुमानसिंगालाहि घेऊन येतों. संगाशीं दोन हात करण्याची त्याची फार दिवसांची इच्छा कदाचित् पुरी होण्याचा संभव आहे.

**तुवर**—ठीक ठीक, ह्यावेळीं ती स्वारी ह्मणजे अगदीं मोहोऱ्यावर देण्यासारखी. वाटेल तर त्याला अमलाची एखादी गोळी नित्यापेक्षां जास्त चढवायला सांगा, ह्मणजे संगानें त्याचीं हाडें कितीहि चुरडलीं तरी त्याला फारसें दुःख वाटणार नाहीं. जा आतां, वेळ गमावूं नका. मीहि असाच जाऊन त्या सिंहाला त्याच्या गुहेंतून हुसकून देतों.

[ जातात.

---

## प्रवेश चौथा.

[ **स्थळ**—संग्रामसिंहाचें शिबिर. ]

**हकीम**—( निद्रित राण्याकडे पाहून ) महाराणाजींस जागें करण्याची वेळ झाली. ( खिशांतून एक दस्त रुमाल काढून राण्याच्या नाकास लावतो. )

**संग्रामसिंह**—जयशंकर ! जयशंकर ! ( उठून बसतो. )

**जवानसिंग**—( आनंद पावून ) हकीम साहेब ! तुमच्या गुणांची तारीफ किती करावी ! राजस्थानच्या प्रतापसूर्याआड आलेलीं अभ्रपटलें फांकून गेलीं, व तो आपल्या दिव्य तेजानें पुन्हा प्रकाशूं लागला, हें पाहून माझ्या हृदयांत आनंदाचें भरतें आलें आहे. ( संग्रामसिंहाच्या पुढें नम्र होऊन ) सरकार ! आजच्यासारखा सुदिन यापूर्वीं कधींहि उगवला नसेल !

**हकीम**—हुजूर ! आपल्या अंगांतील ज्वर आतां अगदीं निघून गेला आहे व आपलें प्रकृतिमान इतकें समाधानकारक दिसत आहे कीं, त्या औषधीचा दुसरा खुराक देण्याची जरूरी नाहीं. आतां एवढीच सूचना आहे कीं, हुजुरांनीं बोलण्याचे फारसे श्रम न घेतां स्वस्थ चित्त करून आणखी कांहीं वेळ विश्रांति घ्यावी.

**संग्रामसिंह**—हकीमसाहेब ! आपण फर्मावितां तें मला मान्य केलेंच पाहिजे. पण मी आपणाला खात्रीपूर्वक सांगतों कीं, ज्या प्रखर ज्वरानें आजपर्यंत माझें शरीर भाजत होतें, तो इतका नाहींसा झाला कीं, या क्षणींच जरी एखाद्या वीराशीं सामना करण्याचा प्रसंग आला, तरी दोन हात करण्याचें सामर्थ्य माझ्या

अंगीं आलें आहे. निःसंशय, ही औषधी व तिचा योजक हीं बाबरशहाला ईश्वरापासून अद्भुत देणगीदाखल प्राप्त झालीं आहेत. जवानसिंग ! या वेळीं खजिन्यांत शिल्लक काय आहे ?

**जवानसिंग**—हें मला याक्षणींच बरोबर सांगतां येणार नाहीं.

**संग्रामसिंह**—ठीक आहे. ती कितीहि असो–ज्या अश्विनीकुमारतुल्य चतुर धन्वंतऱ्यानें या मृत होऊं पहाणाऱ्या माझ्या देहास व्रजभूमीच्या उद्धाराच्या कामीं कष्ट करण्यासाठीं पुन्हा सजीवत्व दिलें, त्याच्या गुणांची किंमत प्रत्यक्ष कुबेरालाहि करवणार नाहीं ! मग मजसारख्याचा काय पाड ! तरी देखील जवानसिंग ! सरकारी खजिन्यांत यावेळीं जी कांहीं शिल्लक असेल ती सर्व या हकीमाच्या हवालीं कर, मात्र ती एक लाखाहून कमी असल्यास जवाहिरानें तिची भरपाई कर.

**जवानसिंग**—आज्ञा सरकार !

**हकीम**—हुजूर ! खुदातआलानें दिलेली देणगी मी विकित नाहीं ! तसें केलें असतां, या अमृततुल्य औषधाचे सर्व गुण या जडजवाहिरास ललचावलेल्या पापी हातांनीं स्पर्श केल्याबरोबर त्याच्यांतून तावडतोब नाहींसे होतील. आपण मला बक्षीस देण्याचा हुकूम फर्माविला, यांतच मला मोठें भूषण प्राप्त झालें. आणखी एकदा माझी विनंति आहे कीं, हुजुरांनीं कांहीं वेळ स्वस्थ पडावें.

**संग्रामसिंह**—कबूल आहे. ( इतक्यांत बाहेर गोंगाट होतो. ) अरे–ऐका ! हा काय दंगा आहे ? हा गोंगाट व हीं वाद्यें कशाचीं ऐकूं येतात ? जा, जा, जवानसिंग ! पाहून लवकर ये. ( जवानसिंग बाहेर जाऊन लगेच परत येतो. )

**जवानसिंग**—सरकार ! तो गजसिंग व त्याची दारूबाज स्नेही मंडळी छावणींतून वाजतगाजत चालली आहे, त्यांचा गोंगाट हा.

**संग्रामसिंह**—हा गजसिंग किती मूर्ख आहे पहा ! ही आपली पशुवत् मद्यवशता आपल्या तंबूंतच आवरून न धरितां तिचा तमाशा सर्व छावणीभर दाखवून आपलें हंसूं करून योग्यता घालविणें यांत त्याला कोणता लाभ झाला !

**पहारेकरी**—( प्रवेश करून ) सरकार ! रायसीनचे राजा तुवर कांहीं अत्यंत जरुरीच्या कामाकरितां मुलाखतीची इच्छा करितात.

**संग्रामसिंह**—जा, त्यांनां आंत पाठवून दे. ( तुवर आंत येतो, मुजरा होतो. ) कां, काय गडबड आहे ?

**तुवर**—सरकारची प्रकृति दुरुस्त पाहून मनाला फार आनंद होतो.

**संग्रामसिंह**—समजलों, पुढें बोला—

**तुवर**—मी आज गजसिंगजीकडे मेजवानीला गेलों होतों—

**संग्रामसिंह**—असें काय ? मग आपली मंडळी व गम्मत सोडून इकडे कसे झुकलांत ? शुद्धीवर आहांना ?

**जवानसिंग**—( तुवरास गप्प रहाण्याची खूण करितो. तो लक्ष्य देत नाहीं. )

**तुवर**—सरकार, गजसिंगजी आज बेताल झाले आहेत.

**संग्रामसिंह**—हें समजण्याइतके आपण तालावर आहांत हें पाहून पुष्कळ समाधान वाटतें. या स्वारींनीं कोणत्या नवीन चेष्टा सुरू केल्या आहेत ?

**जवानसिंग**—( तुवरास पुन्हा खुणवतो. तो लक्ष्य देत नाहीं )

**हकीम**—खुदावंत ! आपण या दारूबाजांच्या माकडचेष्टांत मन न घालतां स्वस्थ आराम करावा. अहो मेहरबान, आपणहि घरीं जाऊन झोंप घ्या, व आपलें महत्त्वाचें काम पुढें एखादे वेळीं घेऊन या.

**तुवर**—सरकार ! स्वत: मी कोणत्याहि प्रकारें बेसावध झालेला नाहीं. मात्र गजसिंग दारूच्या धुंदींत जी अयोग्य गोष्ट आतां करित आहे, तिचा संबंध प्रत्यक्ष आपल्याशीं असल्यामुळें आपणास वेळींच सावध करण्याकरितां मी आलों आहें ! याउपर आपली मर्जी. हुकूम झाल्यास निघून जातों.

**संग्रामसिंह**—थांबा, कोणती गोष्ट, सांगा ?

**तुवर**—सरकार ! त्या दारुबाजाच्या सर्व चेष्टा सहन केल्या असत्या; परंतु महाराणा संग्रामसिंहांचें बजरंग टेंकडीवरचें भव्य निशाण उपटून टाकून त्या जागीं त्यानें स्वत:चें निशाण रोंवण्यास उद्युक्त व्हावें, ही चेष्टा कोणत्या तऱ्हेची ?

**संग्रामसिंह**—( गर्जून ) काय तुवर, काय ह्मणालास ? पुन्हा बोल पाहूं ?

**तुवर**—सरकार ! मूर्ख मूर्खासारखा वागतो, यांत इतका संताप करून घेण्याचें कारण नाहीं.

**संग्रामसिंह**—( पलंगावरून धाडकन् उडी घेऊन एकदम पोषाख करूं लागतो ) बस्स ! एक अक्षर जास्त बोलूं नको !

**जवानसिंह**—सरकार ! ( त्यास आवरावयास जातो. )

**संग्रामसिंह**—जवानसिंग ! खबरदार, हो मागें ! एक चकार शब्द बोलशील तर मी तुला आपला शत्रु समजेन !

**हकीम**—हुजूर, आपली तब्बेत!

**संग्रामसिंह**—हकीमसाहेब ! माफ करा. तुमचेंहि या वेळीं कांहींएक ऐकणार नाहीं.

( तडाक्यानें तरवार घेऊन निघून जातो. राण्याबरोबर जवानसिंगाशिवाय बाकीचे सर्व लोक जातात. )

**जवानसिंग**—( स्वगत ) हा तुवर लबाड आहे, व ह्यानेंच ही कळ लाविली असावी, अशी माझी खात्री होते. आतां स्वस्थ बसण्याची वेळ नाहीं. हा कलह नुसता तोंडानें मिटेलसें वाटत नाहीं. यासाठीं अगोदर त्या करणसिंगाला तरी राण्यामागें पाठवून द्यावा. ह्या छावणींत इमानाला जागणारा ह्या जवानसिंगाचा जोडीदार तो एकच दिसतो आहे. चला तर, त्याला पुढें पाठवून आपणहि थोडेसे हत्यारबंद लोक घेऊन त्याच्या मागोमाग जावें. ह्या तंब्याचीं पाळेंमुळें किती खोल गेलेलीं आहेत, ह्याचा अंदाज लागणें कठीण आहे.

[ जातो.

---

## प्रवेश पांचवा.

[ **स्थळ**—बजरंग टेंकडी. गजासिंग वगैरे वाजतगाजत प्रवेश करितात. ]

**गजासिंग**—कुठें आहे तें चितोडचें निशाण ? ( उपटूं लागतो. )

**गप्पीदास**—सरकार, सरकार, संभाळा, सिंहाला दांत असतात !

**गजासिंग**—आणि गरुडाला नखें असतात !

**विषदूक**—सरकार, जसा गरुड सर्व पक्षांचा राजा आहे, तसाच सिंहहि पशूंचा राजा आहे, व दोघे स्वतंत्र आहेत. यासाठीं कोणाचाहि अपमान न होतां दोन्ही निशाणें एकमेकांजवळ बरोबरीनें उभीं करावीं.

**गजासिंग**—ठीक आहे. तुमच्या ह्मणण्याप्रमाणेंच का होईना. माझें तरी ह्मणणें इतकेंच कीं, माझा मान संग्रामसिंहाच्या बरोबरीनें राहिला ह्मणजे बस्स. ( आपलें निशाण रोंवतो. ) चालूंद्या मंडळी, येथेंहि खूप गम्मत उडवून द्या. अगदीं कसूर करूं नका. कसूर केली तर समजेन कीं आमच्याठाईं तुमचें खरें प्रेम नाहीं. ( वाद्यें वाजतात, दारूचा धिंगाणा सुरु होतो. )

**गप्पीदास**—अरे, अरे, अरे ! सिंह आलारे आला ! दूर व्हा ! पळा ! ( पळापळ होते. स्वगत ) अरे हा गरुड कां थिजला ? एकदम उडून सिंहावर तुटून कां नाहीं पडत ? जागच्या जागीं थंडा होतो कीं काय ?

**संग्रामसिंह**—( प्रवेश करून त्वेषानें गजसिंगाचे निशाणावर हात ठेवून ) चितोडच्या भव्य निशाणाशेजारीं ही भिकार चिंधी उभी करण्याची छाती कोणीं केली ? बोल, कोणाचें काम हें ?

**विदूषक**—( बाजूस ) आमच्या महाराजांनां अर्धांगवायूचा झटका झाला वाटतें ?

**गजसिंग**—( घाबरून ) मी जयपुरचा गजसिंग, तें निशाण माझें आहे.

**संग्रामसिंह**—तर मग चितोडचा महाराणा जयपुरच्या राण्याला व त्याच्या निशाणाला कितपत मान देतो हें आतांच पहा ! ( निशाणाचा भाला मोडून कपडा पायाखालीं तुडवितो.) जयपुरच्या निशाणाला मी लाथेखालीं तुडवितों. जर तुह्मांमध्यें कोणाची छाती असेल, तर त्यानें पुढें येऊन हें मजपासून सोडवून न्यावें. (*इतक्यांत जवानसिंग करणसिंग वगैरे महाराण्याकडील मंडळी येतात. )

**गप्पीदास**—( मंडळीस उद्देशून, बाजूला ) चालूंद्या गम्मत, अगदीं कसूर करूं नका ! मारे रंगीरंग उडाला पाहिजे ! !

**हनुमानसिंग** ( गजसिंगाकडचा एक मानकरी )—गडे हो ! ह्या महाराण्यानें आपल्या देशाच्या निशाणावर ह्मणजे खुद्द आपल्या मानेवर पाय दिला आहे. तर पहातां काय, व्हा पुढें आणि तुडवा याला इथच्या इथें. ( तो राण्यावर वार कारितो परंतु करणसिंग तो आपल्या ढालीवर घेतो. )

**संग्रामसिंह**—शाबास करणसिंग ! हनुमानसिंग, या धर्मयुद्धांत सामील असलेल्या कोणाहि इसमावर तलवार न उचलण्याची मीं शपथ घेतली आहे, ह्यामुळेंच या वेळीं तुझा प्राण बचावला जात आहे. तरीपण चितोडच्या महाराण्याची तुला आठवण राहिलीच पाहिजे. ( एक ठोंसा मारून त्याला लोळवतो. ) ह्मणजे असा अविचार पुन्हा तूं करणार नाहींस.

**गजसिंह**—( मागें हटून ) संग्रामसिंह अतिशय आजारी आहे, तो हा नव्हे असें मला वाटतें.

**गप्पीदास**—रंग आहे. रंग ( हळूच ) रक्ताचा ! ( हनुमानसिंगाला बाजूला नेतात, व मेघसिंह व तुवर वगैरे मंडळी येतात. ) हां, हे आले काय ? ( विदुषकाला ) आपण आतां बाजूला झालें पाहिजे. शहाणे शहाणे येथें जमल्यावर तुझ्या च माझ्यासारख्या मूर्खांचा धंदा करणारांस कोण विचारितो !

**मेघसिंह**—( आश्चर्यदर्शक मुद्रेनें ) काय ? चितोडचे महाराणा संग्रामसिंह आणि जयपूरचे महाराणा गजसिंग यांच्यासारख्या श्रेष्ठ पुरुषांनीं–या धर्मयुद्धाच्या धुरीणांनीं आपापसांत–आणि असा कलह करणें फारच अनुचित!

**संग्रामसिंह**—( निशाणावरचा पाय थोडा मागें घेऊन ) बस करा, मेघसिंहजी. हा तुमचा राणा, महाराणा, धुरीण असा गजसिंग यानें उन्मत्तपणा केला, त्याबद्दल त्याला शासन झालें. जास्त कांहीं नाहीं.

**गजसिंह**—( स्वगत ) आतां मला धीर आला. ( पुढें होऊन ) मेघसिंहजी व इतर रजवाडे, आपण याचा न्याय करा! माझा केवढा अपमान झाला आहे, हा ध्यानांत आणा. माझ्या निशाणाचा भाला मोडून व पटक्यावर पाय देऊन तुमच्यासमोर हा महाराणा अद्याप उभा आहे, याचा विचार करा.

**संग्रामसिंह**—याचें कारण इतकेंच कीं, तें निशाण तुह्मीं माझ्या निशाणा शेजारीं रोंवलें.

**गजसिंग**—मग माझा हक्क व अधिकार तुमच्याहून कमी आहे काय ?

**संग्रामसिंह**—हक्काची बरोबरी लावतां तशीच ताकदीची लावा बरें ? ह्मणजे या चिंधीसारखे तिचेहि धुडके उडवून देतों ! पहा तर खरी मौज.

**गप्पीदास**—( बाजूस ) एवढी गोष्ट मात्र कोणीं काढूं नये.

**मेघसिंह**—अशा भांडणांत लाभ कोणता ? गजसिंगजी ! हें निशाण येथें मुद्दाम रोंवण्यांत तुह्मीं मोठी चूक केली. आपल्या छावणींत महाराणाजींचें निशाण आपण सर्वांत उंच ठिकाणीं रोवूं दिलें, यावरून आपण राजस्थानांतील स्वतंत्र राणे मानानें संग्रामसिंहजींहून हलके झालों, हा समज चुकीचा आहे. संग्रामसिंहजींनां आपण सर्वांनीं या मोहिमेपुरते मुख्य सेनापति केलें, एवढ्यावरून सर्वच गोष्टींत त्यांचा ताबा आह्मांवर चालूं शकणार नाहीं, या गोष्टी उघड उघड असून असल्या हलक्या संबंधांत इतक्या निकरावर मजल यावी, हें कोणालाहि उचित होणार नाहीं. गजसिंगजी! मूळ चुकी तुमची आहे, यासाठीं तुह्मीं झालेल्या प्रकाराबद्दल प्रथम दिलगिरी प्रदर्शित करावी; नंतर महाराणाजींनीं जो तुमचा अपमान केला त्याबद्दल तेहि जबाब देतीलच.

**विदूषक**—( बाजूस गप्पीदासास ) इतकें शहाणपणाचें भाषण मीं जन्मांत ऐकिलें नव्हतें !

**गप्पीदास**—( त्याला बाजूस ) बाबा, हा शहाणपणा ह्मणजे आगींत तेल ओतल्यासारखा आहे, समजलास ?

**गजसिंग**--याचा निकाल असा उभ्याउभीं न लागतां राजसभेंत सर्वांनुमतें लागावा, अशी माझी इच्छा आहे.

**मेघसिंह**—तेंहि ठीक आहे. महाराणाजींनां देखील ही गोष्ट पसंत पडेल, असें मला वाटतें.

**संग्रामसिंह**—मेघसिंहजी, माझी प्रकृति अद्यापपर्यंत सुधरली नाहीं, तापाची गुंगी अझून मजवर आहे. शिवाय, फार बोलण्याचा मला तिटकारा आहे. ह्मणून एवढेंच निक्षून सांगतों कीं, चितोडच्या मानापमानसंबंधांत निर्णय करण्याकरितां कोणाहि राजाला अगर राजमंडळाला मी मध्यस्थी करूं देणार नाहीं. हें माझें निशाण येथें उभें आहे. ज्या कोणाचें निशाण इत:पर यापासून तीन भाल्याचे आंत रोंविलें जाईल, त्याची व्यवस्था या माझ्या पायांखालच्या चिंधीप्रमाणेंच केली जाईल, हें पक्कें ध्यानांत ठेवा! या कामांत मला एकट्याला पन्नास योद्ध्यांबरोबर लढावें ला लें तरी मी तयार होईन; परंतु इतर कोणत्याहि प्रकारचा जबाब देणारा हा संग्रामसिंह नव्हे!

**विदूषक**—( बाजूस ) हें मात्र माझ्या इतकेंच मूर्खपणाचें भाषण झालें!

**गप्पीदास**—( बाजूस ) पण ध्यानांत ठेव कीं, या कामांत संग्रामसिंहाहूनहि श्रेष्ट प्रतीचे मूर्ख येथें आहेत. पहा, यांपैकीं एखादा आपलें निशाण जर आतांच येथें उभें करूं लागला, तर त्याची अवस्था त्या हनुमानसिंगाप्रमाणें तत्काल होईल यांत शंका नको.

**मेघसिंह**—संग्रामसिंहजी! नवीन तंटे उपस्थित करण्यासाठीं मी येथें आलों नाहीं. आपलें भांडण तुर्कांशीं, व चढाओढ लावणें ती त्यांशीं लढतांना जास्त पराक्रम करण्यांतच लावावयाची, यासाठीं हा तंटा येथेंच मिटून पूर्वीप्रमाणें बंधुत्वाचें नातें कायम ठेवून आपण सर्वांनीं येथून जावें, असें माझें मत आहे.

**संग्रामसिंह**—ठीक आहे, जशी आपली इच्छा. ( मेघसिंह गजसिंगाचा हात संग्रामसिंहाच्या हातांत घालतो. )

**गप्पीदास**— }
**विदूषक**— } ( एकस्वरानें ) शुभमंगल सावधान!

( संग्रामसिंहाचे मंडळीशिवाय इतर सर्व जातात. जातां जातां गजसिंग संग्रामसिंहाकडे खुनशी मुद्रेनें पहातो.)

**संग्रामसिंह**—( स्वगत ) ह्या सर्व कलागतीच्या बुडाशीं कांहीं तरी कारस्थानीपणा असलाच पाहिजे. हें निशाण असेंच सोडून जाणें बरें नाहीं.

( एकदम ) करणसिंग ! उद्यां सूर्योदयापर्यंत तुह्मीं येथें सक्त पहारा करा. निशाणापासून तीन भाल्यांपलीकडे जाऊं नका. कांहींतरी दगाफटका होईल असा मला संशय आहे. करितां एका वेळीं तिहींपेक्षां जास्त शत्रु आल्यास आपली तुतारी वाजवा, ह्मणजे आह्मी तुमच्या मदतीला येऊं. निशाणाचा बचाव ह्मणजे खुद्द चितोडच्या मानाचा बचाव करण्याचें अत्यंत जोखमीचें काम तुमच्यावर सोंपविलें आहे, हें ध्यानांत ठेवा.

**करणसिंग**—सरकार, नोकरींत कसूर झाल्यास हें शिर उतरून देईन !

**संग्रामसिंह**—तुमच्या पराक्रमावर आमचा पूर्ण भरंवसा आहे.

[ करणसिंगाखेरीज सर्व जातात.

**[ पडदा पडतो. ]**

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

[ **स्थळ**—बजरंग टेंकडी. रात्रीची वेळ. करणसिंग पहारा करित आहे, निशाणाजवळ कुत्रा बसलेला आहे, असा प्रवेश. )

**करणसिंग**—( स्वगत आनंदानें ) आतां मात्र मी महाराण्याच्या कृपापात्र मंडळींत येऊन प्रविष्ट झालों, यांत संशय नाहीं. महाराण्याची दिगंत कीर्ति ऐकून येथें जमलेल्या महान् योद्धयांपैकीं ज्यांनां तो अद्याप पूर्णपणें ओळखीतहि नाहीं, अशांपैकींच मी एक नाहीं हें निःसंशय आहे. ह्या अशा भयंकर जोखमीचे कामगिरीवर त्यानें माझी नेमणूक केली, हा मजवर मोठाच अनुग्रह झाला असें समजलें पाहिजे. चितोडच्या महान् प्रतापी राजघराण्याचा मानापमान आज माझ्या अंगच्या कर्तबगारीवर अवलंबून आहे. यासाठीं मी एखादा यःकश्चित् साहसी शिपाई नसून माझें नांव प्रसंगविशेषीं राणावतजी कमलावती यांचे कानीं खात्रीनें जाईल. दैववशात् याच कामांत एखाद्या प्रबल शत्रूशीं प्रसंग घडून हा देह या निशाणाजवळ पतन झाला, तर प्रत्यक्ष महाराणा संग्रामसिंह त्याचा भयंकर सूड उगविण्यास तयार होईल, त्याच्या राजघराण्यांतील स्त्रियांस मजबद्दल वाईट वाटेल, व त्या अश्रूहि ढाळतील. तसेंच, या कामगिरींत भाग्यवशात् यश आलें, तर मग काय? प्रियतमा कमलावती व मी, या आह्मां दोघांमध्यें माझ्या द्रव्यस्थितीच्या मानानें जें एकप्रकारचें महदंतर आहे, तें ताबडतोब अंशतः तरी कमी होईल, व पूर्वीपेक्षां जास्त आशेला आधार होईल. एकंदरींत, या कामगिरीचा परिणाम कसाहि झाला, तरी माझ्यासारख्या शिपाईगड्याच्या महत्त्वाकांक्षेचीं दोन अग्रें जीं प्रीति आणि कीर्ति, त्यांपैकीं कोणतेंहि एक गांठिलें जाऊन माझ्या जन्माचें सार्थक होणार, यांत संदेह नाहीं. ( कुत्रा भुंकतो. ) कां रे शेऱ्या, कां भुंकतोस रे? बरोबर हा इकडून कोणी येत आहे. कोण आहेरे? थांब, उभा रहा!

**वेताळ्या**—( दुरून ) भल्या मानसा, त्ये तुझ्या चौपायांच्या सैतानाला अदुगर डांबून धर, न्हाइंतर आमची सवारी म्होर कशी येनार!

**करणसिंग**—( न्याहाळून ) तुला माझ्याकडे येऊन काय कर्तव्य आहे? तूं कोण आहेस? याद राख, जवळ येशील तर फुकट मरून जाशील!

**वेताळ्या**—( दुरून ) त्ये तुझ्या कुत्र्याल्हि अदुगर बांध, न्हाईंतर ह्ये माझा तीरकमटा त्येस्नि रामच म्हनाया लावतो!

**करणसिंग**—आपला तिरकमटा बाजूला ठेवून अगोदर असा उजेडांत ये, नाहीं तर तूं कोणीहि असलास तरी तिथल्या तिथें ठार करीन!

(वेताळ्या टणकन् उडी मारून धनुकलीसह पुढें येतो.)

**वेताळ्या**—राम राम!

**करणसिंग**—(स्वगत) ही पिडा कशाला आली?

**वेताळ्या**—क्यंव बे शिपाय! येतालजी ह्मराजास्नि रामराम बी करित न्हाइ आँ! आक्षि आमची भूल पडली व्हय?

**करणसिंग**—वः, वेताळमहाराज! अशी गोष्ट कशी होईल? आपणाला एक वेळ पाहिल्यावर कोणीतरी विसरेल काय? माफ करा—मी यावेळीं पहाऱ्यावर असल्यामुळें आपणाशीं कोणताहि सलगीचा प्रकार करूं शकत नाहीं. तरी पण आपण मला पूज्य आहां, व आपले सेवेंत मी तत्पर आहें.

**वेताळ्या**—बेस. चला तर मंग, व्हा म्होर.

**करणसिंग**—अरे कुठें?

**वेताळ्या**—जकुडचा हुकूम घेऊन मी आलुया तकड.

**करणसिंग**—वेताळमहाराज! या गोष्टींतहि मला आपल्या ह्मणण्याप्रमाणें वागतां येणार नाहीं. मी आतां पहाऱ्यावर आहें, व पहारा सोडून सूर्योदया-पर्यंत मला कोठेंहि जातां येणार नाहीं. (फिरूं लागतो.)

**वेताळ्या**—(आड येऊन) बगा बरं, आमी सांगतों इतल्यावर शाने होऊन-शान् आमच्यासंग चला, न्हाइतर बगलत आनलेला आमच्या ताइसाबांचा हुकूम जर का एकदा तुमच्यावर सोडला तर आक्षी बंदुकीच्या गोळीवानी धावत सुटाल.

**करणसिंग**—(स्वगत) काय! माझ्या प्रियतमेचाच निरोप घेऊन हा आला आहे? पण असा निरोप काय बरें असेल? आणि ती तो अशा व्यक्तीबरोबर पाठवील, हें अगदींच संभवत नाहीं. तरीपण—(उघड) कारे वेताळ्या! तूं बाई-साहेबांचा हुकुम ह्मणालास नाहीं का? बरोबर, त्या मठांत जिच्याबरोबर तूं झाडझूड करित होतास तीच ना ही बाईसाहेब?

**वेताळ्या**—कसं ह्मनताजी! आमची पट्टरानी तुझ्यासारख्या शिपुरड्याक्षि कशापाइ हुकुम कराया जाते? कां आमच परदान समद मेल व्हय? राव! धाकल्या बाइसाब तुमच्यावर जरी आक्षी फिदा झाल्या, आन् त्येनी असली खुनची अंगुठी बी तुमास्नि दावाय देली, तरीबी आमच्या रानीसरकार तुमची—

**करणसिंग** (घाईनें) काय! पाहूं पाहूं ती आंगठी! कोणीं दिली ह्मणालास? ( त्याला विलगतो. )

**वेताळ्या**—हिसकाहिसकी कशापाई जी ? जा तुमी आपल्या पाऱ्यावर! नाय देत अंगुठी. काय कराल माज ?

**करणसिंग**—खात्रीनें आंगठी माझ्या प्रियतमेचीच! आणरे बुवा, पाहूं तर देशील! पाहारा कुठें जातो आहे!

**वेताळ्या**—हो पन, नुसती अंगुठी दिसली तर ह्यो परकार, आन् अंगुठीची धनीन दिसली तर ? ठ्येवत्याल संमदी काम बगलत गुंडाळून. घ्या अंगुठी आन् व्हा म्होर. आमच्या ताईसावानीं बलावलया. ( जाऊं लागतो. )

**करणसिंग**—( त्याच्या मागें लागून ) अरे, पण जरा थांब. ( स्वगत ) खूण बरोबर आहे. पण ही आंगठी—कायरे, खरेंच सांग–तुझ्या हातीं कशी आली? हें पहा, तुझी नेहमींची थट्टा जरा बाजूला ठेव. कोणीं दिली तुला ही आंगठी आणि कशाकरितां ?

**वेताळ्या**—इतकी पंचाईत कशा पाइंजी! ययाच असल तर या, न्हाई तर बसा थतच, आमी सांगून देऊं बाइसाहेबास्नी.

**करणसिंग**—(गोंधळून स्वगत) मोठी पंचाईत आली. (उघड) कारे वेताळ्या, मी येथें लष्करी पहाऱ्यावर आहें आणि सूर्योदयाच्या आंत येथून हालल्यास माझा जीव व त्याहूनहि प्रिय जी अब्रू ती प्रसंगीं नाहींशी होईल, हें राणावतजींस माहीत असून त्या मला अशी खूण व निरोप आणि तो तुझ्यासारख्याच्या हातीं व भलत्याच वेळीं पाठवितील, हें संभवत नाहीं.

**वेताळ्या**—ब्येस हाये, राम राम शिपाई दादा! ( जाऊं लागतो. )

**करणसिंग**—अरे पण जाशील! इतकेंच सांग, त्या येथेंच कोठें जवळपास आहेत का ?

**वेताळ्या**—तुमी तर आक्षी भाड्याच्या तट्टावानी दिसताजी! इसुकमिसुकाच म्हटल म्हंजी हाक दोन हाकांवर जान, आन् धा धा कोस जान आक्षी सारखच! जवाका आमची सवारी आमच्या परानपिर्येवर फिदा झाली तवां तर धा धा कोस जाऊन आन् धा धा भिंताड बि उडून जावीयेवी लागत. आन् हत तर काय, त्यो चंदर्मा हायका न्हाय, त्यो ताईसाबांच्या तंबूच्या आक्षी डोक्यावरच हाय बगा. ह्यो धनुकलींतून तीरबी सोडला तर तितलाच दूर जाईल!

**करणसिंग** ( आंगठीकडे पाहून ) यांत कांहीं लबाडी तर नसेल ना? छे, पण आंगठीवरून तसें मानतां येत नाहीं. बघ वेताळ्या, मला तेथें फार वेळ थांबावें नाहीं ना लागणार ?

**वेताळ्या**—योळ! हत कोना ल्योकास्नि ठावा योळ? त्यो दिसत बी नाय आन् गवसत बी नाय, आन् कशासी खात्यात त्यें बी ठाव नाय! ह्यो घंटा वाजत्यात न्हाय असल शेंपन्नासच वाजतील लइ झाल तर.

**करणसिंग**—( स्वगत ) काय मूर्ख आहे पहा! ( उघड ) खरोखरच का माझें तेथें इतकें जरुरीचें काम आहे, कीं पहांट होईपर्यंत देखील अवकाश नाहीं?

**वेताळ्या**—मला काय ठावजी! धादा सांगतल तरी बी उमजत नाय! ताईसाब आक्षी इक्तच बोलल्या–'ज्या हातानं फुलं मिळालीं त्योच हात माळबी घालील.' (करणसिंग चकीत होतो.) (स्वगत) गोळी पन आक्षी काळजालाच जाऊन भिनली! ( उघड ) चला जी, य्येता का म्हून? न्हाई तर आना ती अंगुठी. शिपाईगडी दिसतो आन् भागुबाईवानी करतो. ( जाऊं लागतो. )

**करणसिंग**—अरे हो, हो! थांब, मीहि येतोंच. ( स्वगत ) मी कांहीं संग्रामसिंहाची प्रजा नाहीं किंवा त्याचा दास नाहीं.

**वेताळ्या**—अंगुठी आनाजी अंगुठी—

**करणसिंग**—अरे पण, एक क्षणभर थांब. मला थोडा विचार करूं दे. ( स्वगत ) समजा, मी आतां याच्याबरोबर गेलों, आणि शत्रूंनीं तितक्यांत येऊन हें निशाण चोरून नेलें, मग? संग्रामसिंहाशीं गांठ! शिवाय, बोलूनचालून अब्रूला अक्षय्य कालिमा! ( उघड ) वेताळ्या! खरेंच सांग, फार दूर जायाचें नाहीं ना?

**वेताळ्या**—नायजी! आक्षी त्यो पल्याड दिसत्यो, त्योच तंबू.

**करणसिंग**—( स्वगत ) क्षणभर गेलों असतां काय हरकत आहे! कदाचित कोणी आलाच तर माझा शेऱ्या भुंकेलच. मग मी प्रियतमेची विनवणी करीन, व आपल्या जागेवर ताबडतोब हजर होईन. ( उघड ) शेऱ्या, सांभाळ बरें! चांगला पहारा कर आणि कोणालाहि निशाणाजवळ येऊं देऊं नकोस. चल वेताळ्या, ताबडतोब जाऊन कामगिरी बजावून येऊं. चल, धाव.

**वेताळ्या**—ज्येची कामगिरी असेल त्यो धावल! माझ काम झाल. मी तर आतां आक्षी मुंगीवानी चालनार. तुमीं चालनार आक्षी उंटावानी व्येग टाकीत. आमी राज लोक तर थाटानं आस्त आस्त कदम टाकीत जानार!

**करणसिंग**—असल्या व्यक्तीशीं बोलायचें तर सरळपणा उपयोगाचा नाहीं! ( त्याचें मनगट धरतो, व त्याला पुढें ढकलतो. )

**वेताळ्या**—म्येलों, म्येलों, नग-नग-व्हतों, म्होर, व्हतों म्होर, आक्षी बोकोबाच्या पंजांत मामूजीच गवसला.

[ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ **स्थळ**—राणी कर्णावतीचा तंबू. राणी पलंगावर बसली आहे, जवळ दासी उभ्या आहेत, असा प्रवेश. ]

**राणी**—कांग, वेताळ्या अझून कां बरं आला नाहीं? एक घटका होऊन गेली त्याला गेल्याला, नाहीं का ?

**रामप्यारी**—बाईसाहेबांनीं या असल्या नाजुक कामगिरीवर वेताळ्याला मुद्दाम कां पाठविलं कोण जाणे !

**राणी**—अग, काम नाजुक खरं, पण तें तुझ्यासारखीच्या किंवा आणखी कुणा एखाद्या शहाण्याच्या हातून करवून उपयोग नाहीं. आणखी तुला खात्रीनं सांगत्यें, कीं, कांहीं कांहीं गोष्टी वेडयाच्या हातून जितक्या सफाईनं व खुबीदार वठतात, तितक्या त्या शहाण्याच्यानंहि होणार नाहींत. ठाकुरजीच्या मठांतली आहे कीं नाहीं तुला आठवण? वेताळ्या अन् सटवाईला पाहून करणसिंग कसा भेदरून गेला. मीं मुद्दामच ती मौज करविली होती. तसंच, ही आजची कामगिरीदिखील वेताळ्याला सांगणं मला बरं वाटलं. गाजराची पुंगी चांगली साधली तर खूप गंमत होईल, नाहीं साधली तर आपलं गुपचुप बसलं. बोलून चालून वेडयावरच सोंपविलं आहे !

( वेताळया येतो. )

**रामप्यारी**—बाईसाहेब, हा पहा आलाच वेताळ्या!

**राणी**—कसं कायरे बाबा, काय झालं ?

**वेताळ्या**—आक्षी बराबर.

**राणी**—आला का तो ?

**वेताळ्या**—आलाया ? आनलाया म्हना!

**राणी**—म्हणजे ? येत नव्हता वाटतं ?

**वेताळ्या**—तसंच बगा. त्यो शिपाई लई खंद्या. ताइसाबांच्या नांवाचा त्येच्यावर एकावर एक गोळीबार केला, धमक्याबी घेऊन पाह्यलं, मनांतल्या मनांत रगडून शाबी दिल्या! त्ये अंगुठीची लांचलुचपातबी दावली. आक्षी गुळमाट गुळमाटबी बोललों—आन् पायाबी पडायच्या व्येतांत व्हतों म्हना. पन त्यो गडी हालचना! तवा मी आक्षी सरद झालों बगा! पन माझं नशीब लइ जोरावर, सुचली एक युगत. त्ये ठाकुरजीच्या मठांतली गोष्ट घेली झोकून, आन् मंग काय! झाला नरम, कुंभाराच्या वोल्या हांडीपूनबी. मी जसं म्हनन तसं, जकड न्हेईनं तकड आक्षी एकाद्या चोरावानी पकडून आनलया बगा!

**राणी**—अरे, पण वाटेंत कुणीं पाहिलं तर नाहींना? बोभाटा होईल नाहीं तर!

**वेताळ्या**—त्येच भ्येव नग बाइसाब! जकड तकड आक्षी तकडबंद कारभार क्येलाया.

**राणी**—काम तर खूप छान केलंस!

**वेताळ्या**—बाइसाब आतां इनामबी तसंच छान घेनार!

**राणी**—बरं, देईन बरं. तुला पागोटं पाहिजे, कीं हातांत कडं पाहिजे, का गळयांत कंठी पाहिजे? हें बघ, नाहीं तर तुझ्या त्या पट्टराणीला छानसं लुगडं चोळीच देईन अगदीं जरीकांठी!

**वेताळ्या**—कसं म्हनता? मला मुंडास, कड, आन् कंठी, आन् माझ्या घरानपिर्येला एक चोळी, आन् साडी. व्येस इक्त तर आपुन घालच, पन माइसाब एक हौस हाय बगा!

**राणी**—कसलीरे हौस आहे तुझी?

**वेताळ्या**—ह्ये बगा, म्हाराज सरकार आन् आपुन हत सवारीवर हा; आन् तकड आपल्या मुलखांत आपल्या गादीवर कोनी बी न्हाय—आक्षी रिकामी पडली हाय! तवा म्हनतो, माझी आन् माझ्या पिर्येची घाना तकड रवानगी करून? माझी राजा होन्याची लइ हौस हाय बगा. आपन आलाव कीं घेऊं गादी खाली करून. जन्मभर आपल नांव घेईन बगा! ( पायां पडतो. )

**राणी**—( हंसून ) निघ मेल्या! जा तिथं जाऊन बस. ( सर्व हंसतात )

**वेताळ्या**—( जातांना ) बरं व्हाइल!

**राणी**—जाग ए चंपे! जा आतां बोलाव तुझ्या ताईसाहेबांनां. (दासी जाते.) त्यांचा हा बहादूर आणि कार्यदक्ष शिपाई त्यांचं नांव ऐकतांच आपला

पहारा सोडून चोरासारखा इथं आला आहे, हें त्यांनां प्रत्यक्ष दाखविलंच पाहिजे.! शहाणपणाची त्यांनां मोठी घमंड! ह्मणे प्रेम–प्रेम झालं ह्मणून काय झालं! त्यांचं लग्न एखाद्या राजपुत्राशीं व्हावं ह्मणून आह्मी खटपट करितों तीं सर्व वेडीं, अन् एखादा यःकश्चित् शिपाई, कीं ज्याला घर ना दार, अशावर ह्मणे प्रेम जडलं, व त्याच्याशींच लग्न लावीन ह्मणून आग्रह धरणं हा मात्र शहाणपणा! कां ग, तुला आवडेल ग असं?

**रामप्यारी**—बाईसाहेब! खरंच सांगूं? त्यांच्या अंगीं शहाणपण नाहीं असं नाहीं, पण त्यापेक्षां गर्व आणि टसकाच अधिक आहे!

**राणी**—अगदीं बरोबर बोललीस! दुसऱ्याच्या हातून जर कांहीं एखादी चुकीची गोष्ट घडली, तर मग वन्सं कशा त्याचे हंसून दांत पाडित असतात. आज त्यांची पण चांगलीच खात्री करित्यें! आल्याच बरं का वन्सं–कुणी एकदम बोलूं नका बरं! नाहीं तर सगळाच डाव फसेल अन् गम्मतहि नाहींशी होईल. या वन्सं. (कमलावती येते.)

**कमलावती**—आमच्या वहिनीसाहेब आज फार आनंदांत दिसत आहेत! खरं ह्मटलं, तर इतका वेळपर्यंत एक झोंपसुद्धां होऊन जायची! मीसुद्धां बाई आतां निजणार होत्यें, तोंच बोलावणं आलं. मग काय मोठं जरुरीचं काम असेल तें असो!

**राणी**—वन्सं! तुमच्या झोंपेच्याआड आह्मी नाहीं येत बरंका! पण बाई, इथून गेल्यावर तुह्माला गाढ झोंप कशी लागली असेल ती लागो!

**कमलावती**—कां बरं?

**राणी**—सांगूं वन्सं? पण नको बाई! तुह्माला मोठं वाईट वाटेल.

**कमलावती**—वाटूं दे वाटलं तर! सांग कायतें एकदा.

**राणी**—सांगूंच? पहा बरं वन्सं! पैजेंत हरलांत हो हरलांत!

**कमलावती**—इश्श वहिनी! ही थट्टा आतां पुरे नाहीं का झाली? पुन्हा आपलं तेंच! तुला खरंच सांगत्यें, अशानं थट्टेंतली गमत नाहींशी होऊन ती अगदीं पानचट होते. पन्नास वेळां तुला सांगितलं असेल, कीं, मी कशाची दिखील पैज मारिली नाहीं अन् पुन्हा आपली तूं ह्मणत्येस कीं मीं पैज मारलीच, याला मीं काय करूं?

**राणी**—काय बोललांत वन्सं! तुमच्यापुढं हद्द आहे बाई! नव्हतां का हो तुह्मी ह्मणालांत, कीं, तो करणसिंग आपल्या लष्करी नोकरींत फारच

दक्ष आहे, अन् प्रत्यक्ष तुमच्याबद्दलचे विचार दिखील त्याला अशा वेळीं मोहांत पाडित नाहींत! याच्याबद्दल तुह्मीं आपली आंगठी आणि मीं आपलं कंकण पैजेला लावलं, आठवतं ना पण ?

**कमलावती**—वहिनी! तूंच असं ह्मणत्येस, तेव्हां माझा नाइलाज आहे! पण या तुझ्या दासींनांच विचार. ही पैजेची गोष्ट मूळ कुणीं काढिली? माझी आंगठी तरी तूंच काढून घेतलीस कीं नाहीं ? तरी त्याच वेळीं मीं तुला बजावून सांगितलं होतं, कीं, वहिनी! मजसारख्या कुमारिकेला असली पैज मारणं कधीं शोभणार नाहीं!

**रामप्यारी**—पण ताईसाहेब! त्या करणसिंगाची तुह्मी नव्हतांका कितीतरी तारीफ करीत ?

**कमलावती**—सटवे! काय झालंग त्यांची तारीफ केली ह्मणून ? हाच का तुझा खरेपणा ? त्यांचा पराक्रम पाहून चारचौघं जशीं त्यांनां नांवाजतात, तसंच मींहि त्यांनां शूर ह्मटलं असेल! शूर पुरुष व त्यांचीं कामं यांशिवाय मोहिमेंत बायकांनां बोलायला दुसरा कोणचा विषय असणार ? यांत माझा मुळींच दोष नाहीं. पण तूं मात्र माझ्या बाबतींत असला आगलावेपणा पुन्हा करशील तर संभाळ!

**रामप्यारी**—बाईसाहेब, ठाकुरजीचे मंदिरांतील ती फुलांची गोष्ट—

**कमलावती**—(रागानें) वहिनी! या चहाटळ पोरीचं हे असलं बोलणं ऐकून घेण्याकरितां का मला इथं बोलावून आणलंस तूं ?

**राणी**—चूप रहाग रामप्यारी तूं! तूं कितीजरी आमच्या मर्जीतली असलीस तरी आपली पायरी ध्यानांत धरून वागत जा. असा छुबरेपणा मला आवडणार नाहीं! (तिला बाजूला जाण्याची खूण करिते.) पण वन्सं, तुह्मी तरी इतक्या रागावतां कां ? तुमची आमची थट्टा आजचीच का आहे ?

**कमलावती**—पण असली कसलीग ही थट्टा? कोणत्याहि गोष्टीला मर्यादा ह्मणून जरूर पाहिजे!

**राणी**—वन्सं, पण आम्हीं काय केलं तें एवढंच ना, कीं, पहाऱ्यावर असलेल्या एका शूर शिपायाला आपली नोकरी थोडा वेळ सोडून इथं यायला लावलं! किंवा घटकाभर असं समजा, कीं, एका सुंदर स्त्रीला गोड वाटावं म्हणून मोहांत पडून तो इथं आला; यांत मोठंसं तें काय झालं? खरंच वन्सं! तो कीं नाहीं प्रथम कांहींकेल्या येईचना! पण वेताळ्यानं तुमचं नांव घेतलं मात्र तेव्हां कसा मुकाट्यानं त्याच्या पाठोपाठ आला—

**कमलावती**—( एकदम उठून ) वहिनी ! काय बोलत्येस हें ? तुझ्या माझ्या योग्यतेचा विचार कर ! आपण संग्रामसिंहाच्या राणीवशांतील स्त्रिया, ही गोष्ट ध्यानांत आण. खरंच सांग, ही सगळी थट्टाचना ? खरोखरीच हा प्रकार घडला नाहींना पण ?

**राणी**—वन्सं ! आंगठी हरलांत म्हणून इतकं वाईट वाटायला नको कांहीं ! भिऊं नका, तुमची आंगठी तुम्हाला परत देऊन टाकूं, म्हणजे झालंना ! तुझी जेव्हां तेव्हां आमच्यापुढं स्वतःच्या शहाणपणाचा जो तोरा मिरवित असतां, तो आतां अमळ उतरला, म्हणून आमच्यावर इतकं रागवायला नको कांहीं !

**कमलावती**—तोरा का वहिनी ? ज्या अर्थी मेवाडच्या प्रत्यक्ष महाराणीसाहेब आपल्या आप्तांची बेअब्रू करणाऱ्या थट्टा करूं लागल्या, त्या अर्थी नुसता माझा तोराचसा काय, पण सगळ्या राजस्थानाला खालीं पहाण्याची वेळ लौकरच येईल, हे ध्यानांत ठेव !

**राणी**—आंगठी गेली म्हणून वन्सं फार रागावल्या हो ! आम्ही नाहीं घेत हो तुमची आंगठी ! तिनं आमचं काम करून दिलं. मासा हातीं आल्यावर गळाचं काय प्रयोजन ?

**कमलावती**—(आतुरतेनें) मजजवळ असलेली कोणतीहि वस्तु तूं मागून मीं दिली नाहीं, असं कधीं तरी झालं आहे ? असल्या शंभर आंगठ्या गेल्यानं मी हळहळणार नाहीं ! पण माझी आंगठी दाखवून एखाद्या शूराच्या इभ्रतीला धक्का आणण्यासारखी गोष्ट जर घडून आली, तर त्या गोष्टीबद्दल मलाचसा काय साऱ्या राजस्थानाला कलंक लागेल !

**राणी**—अगबाई ! त्या सरदाराच्या अब्रूची केवढी काळजी पण आमच्या वन्संनां ? मेलं माझं एवढंसुद्धां का वजन नाहीं स्वारींपाशीं ? वन्सं, तुमच्या बहादराचं या आमच्या थट्टेनं कदाचित् होणारं नुकसान भरून काढण्यापुरता आमचा वशीला उपयोगी पडेल बरं का ! स्वारी जरी सिंहस्वरूपी असली तरी पोटांत दया कांहीं कमी नाहीं हो !

**कमलावती**—वहिनी, वहिनी ! अगदीं चुकत्येस बरं तूं ! महाराणाजींनां तूं अद्याप चांगलीशी ओळखित नाहींस ! लष्करी गुन्हा आणि त्याबद्दल क्षमा ! निदान महाराणाजींचेसंबंधीं ही गोष्ट असंभाव्य आहे, हें तुला माहीत नाहीं ? हें पहा, तूं म्हणत्येस तसं खरोखरच जर त्या सरदाराला इथं आणलं असेल, तर कृपा करून

ताबडतोब त्याला परत लावून दे. मी तुझ्यापुढं पदर पसरल्यें! आजपर्यंत तुला कांहीं बोलल्यें असेन त्याची क्षमा कर, आणि या वेळीं माझी अब्रू बचाव.

**राणी**—वन्सं, असं काय पण? भिऊं नका! सगळं कांहीं नीट होईल. खरंच म्हणाल, तर मलासुद्धां आतां असली थट्टा केल्याचं वाईट वाटतं. ( वेताळ्याला ) अरे वेताळ्या!

**वेताळ्या**—( पुढें येऊन ) जी बाईसाब.

**राणी**—कुठं आहे रे तो सरदार?

**वेताळ्या**—ह्यो पल्याडल्या पडद्याआड.

**राणी**—(दचकून) काय मेल्या! इतका जवळ? आमचं सगळं बोलणं ऐकलं असेल कीं त्यानं! ( हळू ) वन्सं, आतां कसं करायचं?

**कमलावती**—आतां काय करायचं! जसं होईल तसं होईल! आतां त्यांची गांठ घेऊन आणखी वर आर्जव केलं पाहिजे. ( कनात बाजूला करते. )

**राणी**—वन्सं-वन्सं-करतां काय हें? विचार करा, माझी निजायची खोली ही! अपरात्रीची वेळ! वन्सं, मी कोण, तो कोण! कांहीं पहाल कीं नाहीं. छे बाई!

( पडदा दूर होतो, आंत करणसिंग तोंड खालीं करून
उभा राहिलेला दिसतो. राणी एकदम निघून जाते. )

**कमलावती**—हें पहा, तुह्माला सर्व कांहीं कळलंच आहे. एकदम आपल्या पहाऱ्यावर निघून जा.

**करणसिंग**—होय, पण—

**कमलावती**—प्रश्न विचारण्याच्या नादीं पडूं नका, जा!

**करणसिंग**—मी प्रश्न विचारित नाहीं, पण ही आपली–(आंगठी पुढें करितो.)

**कमलावती**—आपली काय–तुह्मीं सर्व कांहीं ऐकलं ना? झालं तर. चला। जा पहाऱ्यावरील गैरहजिरीचा प्रत्येक क्षण तुमच्या अब्रूस काळिमा आणित असतां तुह्मीं अझून बोलतच राहतां?

**करणसिंग**—एवींतेवीं माझी अब्रू तर गेलीच आहे! करितां अपराधाच्या शिक्षेचें भय राहिलें नाहीं. आपणापाशीं फक्त एकच विनंति करायची आहे,

**कमलावती**—छे, हें असलं अभद्र बोलणं आपणाला शोभत नाहीं ! माझं ऐकाल तर आपण इथं वेळ मुळींच घालवूं नका! परमेश्वर करील तर अझूनहि सर्व नीटच होईल.

**करणसिंग**—माझ्या नोकरीची आपणाला कांहीं जरूर पडली असेल, असा गैरसमज होऊन मी येथें आलों, यांत माझ्याकडून थोडें धाडसाचें वर्तन झालें, याबद्दल माफी असावी, अशी विनंति आहे. ईश्वर साक्ष आहे, कीं, असें करण्यांत कोणत्याहि प्रकारची कुकल्पना माझ्या मनाला मुळींच शिवली नाहीं !

**कमलावती**—आपणाला आणि क्षमा मीं करायची ? छे, आपण चुकतां! माझ्यासाठीं आपण अशा संकटांत पडलां, याबद्दल आपणच मला क्षमा केली पाहिजे. पण छे, तुह्मी जा ! निघाच ! !

**करणसिंग**—जातोंच; पण ही आपली आंगठी आपण घ्यावी.

**कमलावती**—छे, ती आपणाजवळच ठेवा, ह्मणजे माझी व या प्रसंगाची आपल्याला निरंतर आठवण राहील. जा तुह्मी. स्वत:ची पर्वा नसली तरी निदान मजकरितां तरी जा! मुळींसुद्धां थांबूं नका ! मीहि जात्यें, ह्मणजे सगळा कारभार उरकला ! [ जातात.

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळ**—बजरंग टेंकडी. महाराण्याच्या निशाणाजवळ शेऱ्या कुत्रा पहारा करित असतां गजसिंगाच्या पक्षाकडील लोक येतात. कुत्रा त्यांच्या अंगावर धावतो. तुवर त्याला भाल्यानें जखमी करितो व निशाणाचा कपडा काढून घेऊन भाला मोडून टाकितो, व सर्व पळून जातात. इतक्यांत करणसिंग प्रवेश करितो, असा प्रवेश. ]

**करणसिंग**—( निराशेनें ) हर हर ! नशिबानें अखेर धोका दिलाच ! प्रियतमा कमलावतीनें ह्मटल्याप्रमाणें माझ्या तोंडाला जन्माची काळोखी लागली! ( शेऱ्याकडे पाहून ) शेऱ्या ! काय ही तुझी स्थिति ! तूं मात्र इमानी खरा ! केवढा हा रक्ताचा पूर ! शेऱ्या! तुझ्यासारख्या गरीब, इमानी व निरपराध मुक्या

जनावरावर शस्त्रप्रहार करणारे बहादूर खरेच ! तुझ्या माझ्या स्थितीचा यावेळीं मोबदला करितां येईल का ? तसें होणें शक्य असतें, तर मी किती धन्य झालों असतों ! माझ्या शौर्याची केवढी प्रशंसा झाली असती ! याच ठिकाणीं माझ्या नांवाचा स्मारकस्तंभ उभारला गेला असता, माझ्यासाठीं सर्व जग हळहळलें असतें, व माझी कीर्ति अजरामर झाली असती. परंतु शेऱ्या ! तुझी कींव कोणाला येणार ! तुझी कृति पाहून मोठमोठ्या वीरांनां माना खालीं घालाव्या लागतील ! परंतु मनुष्यजात महान् मत्सरी. मुक्या जनावराच्या गुणांची थोरवी कोण गाणार ! उलट, प्रसंगविशेषीं तुमच्या अंगचे कर्तबगारीवर स्वतःची महती जास्त वाढविण्याला देखील चुकत नाहींत! शेऱ्या ! तूं चाललास हें पाहून माझा जीव फार कासावीस होतो रे ! स्वतः कर्तव्यपराङ्मुख होऊन तुझ्यासारख्या विश्वासू मित्राचे प्राण धोक्यांत घातले, हें पातक मी कुठें फेडूं ? शेऱ्या! यावेळीं सर्व जग माझी छी थू करावयास उभें राहिलें असून तूंहि माझा त्याग करतोसना ? (पाहून) अरेरे ! हें भाल्याचें टोंक आंत घुसलेलें निघत नाहीं ! (कुत्रा किंचाळतो.) छे, हें दुःख असह्य आहे. या अपराधाचें शासन—ह्मणजे सुळीं जाणें—तें देखील इतकें कष्टप्रद होणार नाहीं.

(हकीम येतो.)

**हकीम**—प्राणिमात्राच्यामागें विपत्ति लागलीच आहे ! तिच्या तडक्यांतून कोणी सुटत नाहीं. तिची अवस्था ग्रीष्मऋतूंतील हवामानाप्रमाणें आहे. या ऋतूंत मनस्वी उष्णतेनें मनुष्याच्या अंगाची रात्रंदिवस काहिली होत असते, निरनिराळे रोग याच वेळीं उत्पन्न होतात व सर्व प्रकारें हे दिवस प्राणिमात्रास कष्टप्रद भासतात, हें जरी खरें आहे, तरी त्याच्या जीविताचीं साधनेंहि याच ऋतूंत बीजावस्थेस धरितात, हें विसरतां कामा नये !

**करणसिंग**—कोण हकीमसाहेब ! (स्वगत) अशा स्थितींत यानें मला पहावें, यापेक्षां शूर शिपायाला दुसरें मरण कोणतें ? (उसासा टाकून) असो, जगदीशाची मर्जी ! मी अपमानाचा पुतळाच बनलों आहें, आतां तोंड लपवून काय होतें ! शेऱ्या, तुझी स्थिति मात्र नीट दिसत नाहीं.

**हकीम**—शेख सादीचें ह्मणणें आहे कीं, शेतें नांगरण्याला बैल, व रेताळ मैदानांतून प्रवास करण्याला उंटच सहाय्यास घेतलें पाहिजे. तद्वतच जखमा बऱ्या करण्याला हकीमच योग्य, तें काम शिपायाचें नव्हे !

**करणसिंग**—हकीमसाहेब! या प्राण्याच्या जखमा भयंकर आहेत. शिवाय, तुमच्या धर्माप्रमाणें हें जनावर नापाक आहे. त्याला आपण स्पर्श देखील करूं शकत नाहीं.

**हकीम**—तुह्मी ह्मणतां तें सत्य आहे; परंतु माझ्याजवळ वैद्यक्रियेच्या संबंधांत एखादा क्षुद्र पशु व बलाढ्य राजा, यांत मुळींच भेद नाहीं! आणा तुमच्या कुत्र्याला इकडे. ( त्याला तपासून पहातों. ) करणसिंगजी! हा कुत्रा बरा होईल, अशी मला उमेद आहे. मात्र याला बरोबर घेऊन जाण्याची परवानगी द्या.

**करणसिंग**—आपण याला खुशाल घेऊन जा व बरा झाला तर तो तुमचाच असें समजा. माझ्या खासबर्दाराला बरें केल्यानें आपले मजवर जे महत् उपकार झाले आहेत ते फेडण्याला मजजवळ या जातिवंत कुत्र्याशिवाय कांहीं नाहीं, व खुद्द मलाहि यापुढें शिकार करण्याचें प्रयोजन नाहीं.

**हकीम**—( टाळी वाजवितो—दोन इसम प्रवेश करितात.) या कुत्र्याला तंबूवर घेऊन जा व त्याची नीट शुश्रूषा ठेवा.

**करणसिंग**—शेऱ्या, हीच तुझी आमची शेवटची भेट! जा, तूंच कायतो माझा शेवटचा मित्र राहिला होतास; जा–तुझासारख्या इमानी प्राण्यानें माझ्या सारख्या वचनभ्रष्टाजवळ रहावें, हें योग्य नाहीं! हकीमसाहेब! कर्तव्यपराङ्मुख धन्याची कामगिरी बजावतांना मृत्यु पावणारा हा कुत्रा त्या धन्याहून कितीपटीनें चांगला बरें! (कुत्र्याच्या अंगावरून हात फिरवून) शेऱ्या! जा—असा केविलवाणा मजकडे कशाला पहातोस? माझ्या चरित्राची आज अखेर आहे—जा—तुझ्या शरीराच्या जखमा हा हकीम कदाचित बऱ्या करील; परंतु माझ्या अंतःकरणांतील जखमा बऱ्या करणें त्याच्या शक्तीबाहेर आहे!

[ नोकर कुत्र्याला नेतात. ]

**हकीम**—करणसिंग! तुमच्या जखमाहि बऱ्या होतील! मात्र धीर धरून त्या उघड करून मला दाखवा व जें औषध मी देईन तें घेण्याला तयार व्हा. शहाच्या दरबारांतील सरदार शेरकोह तुमचा दोस्त आहे व शेरकोह व मी परस्परांचे इतके जिवलग आहों, कीं, आमचे देह जरी भिन्न आहेत तरी जीव एकच आहे, असें ह्मटलें तरी चालेल! व त्यामुळें तुमच्यावर प्रसंग पडला असतां होईल ती मदत करणें माझें कर्तव्य आहे.

**करणसिंग**—आपली इच्छाच आहे, तर सांगतों. काल रात्रीं मेवाडचें निशाण या टेंकडीवर फडकत होतें. त्याचा पहारा करणें माझें काम होतें. अरुणोदयाची

वेळ झाली, निशाण चोरीला जाऊन त्याचा भाला मोडून पडला आहे, व हें पाहण्याला मी अद्याप जिवंत आहें !

**हकीम**—असें कसें होईल ? तुमचें चिलखत जसेंच्या तसेंच आहे, तरवारीवरहि रक्ताचा डाग दिसत नाहीं, व मोठमोठ्या शूर योद्ध्यांत तुमची गणना ! असें असून ही गोष्ट कशी झाली ? (थांबून) किंवा कोणा परीच्या नेत्रकटाक्षांनीं मोहित होऊन आपण पहारा तर सोडिला नाहींना ? होय, निःसंशय तसेंच !

**करणसिंग**—हकीमसाहेब ! समजा, त्यांतलाच कांहीं प्रकार असला, ह्मणून आतां उपाय काय ?

**हकीम**—उपाय–उपाय कां नाहीं ? हें पहा, मनुष्य ह्मणजे कांहीं झाडझुडप नाहीं, कीं, त्यानें पृथ्वीच्या एकाच तुकड्याला चिकटून रहावें ! त्याला एका ठिकाणीं रहाण्याचा कंटाळा आला तर त्यानें बेलाशक दुसऱ्या ठिकाणीं निघून जावें ! कुराणांत लिहिलें आहे, कीं, महंमद पैगंबराला मक्काक्षेत्रांतून हांकून लाविल्यावर तो मदिनेस गेला व तेथूनच त्याच्या महत्कीर्तीस प्रारंभ झाला.

**करणसिंग**—याचा माझ्याशीं काय संबंध ?

**हकीम**—संबंध पुष्कळ आहे ! अनावर वावटळापासून महान् ज्ञातेदेखील दूर पळतात. या तुमच्या गुन्ह्याबद्दल महाराणा जबर शिक्षा दिल्याशिवाय रहाणार नाहीं; करितां ती टाळण्यासाठीं तुह्मीं येथून एकदम निघून जा व बाबरशहाचे अजिंक्य बाहुब्याचा आश्रय करा. माझ्यावर डोळे वटारूं नका ! तुमच्याच हिताची गोष्ट मी सांगत आहें. शहा तुमचा आदरसत्कार करील. तुमच्यावर कोणत्याहि प्रकारें जुलूम होणार नाहीं.

**करणसिंग**—हकीमसाहेब ! आज माझ्या नशिबानें उलट खाल्ली आहे, ह्मणून आपलें हें भाषण निमूटपणें ऐकून घेणें मला भाग पडत आहे. ज्या तुर्कांचा बींमोड करण्याची प्रतिज्ञा करून मी या मोहिमेंत सामील झालों, त्यांच्याच तोंडून ही असली नामर्दास उचित अशी सल्ला ऐकणें माझ्या नशिबीं आलें, त्या अर्थीं माझ्या जीवितास धिःकार असो !

**हकीम**—करणसिंगजी ! आपण योग्य विचार करा, ह्मणजे माझ्या बोलण्यांतील सत्यता तुमच्या ध्यानीं येईल. हें पहा, ज्या मोहिमेवर तुमची सर्वस्वीं मदार, तिची वास्तविक स्थिति ध्यानांत आणा. तुमच्या राजमंडळातर्फे वकील बनून बल्लभाचार्यांच्या मध्यस्थीनें जो तहनामा बाबरशहाकडे तुह्मीं स्वतः घेऊन गेलां होतां, त्यांतील शर्ती तुह्मांला माहीत आहेत काय ?

**करणसिंग**—त्यांचें आतां मला काय कर्तव्य? तेव्हां मी राजमंडळाचा वकील होतों; परंतु उद्यां त्याच्याचसमोर सुळावर चढणार.

**हकीम**—ऐका! तो प्रसंग टाळण्यासाठींच मी एवढा उपदेश करित आहें. माझें बोलणें पुरें ऐकून ध्या, ह्मणजे सर्व उलगडा होईल. राजमंडळाची खरी स्थिति तुह्मी जाणत नाहीं असें दिसतें. प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें हे सर्व राजे संग्रामसिंहाला तोंडघशीं पाडून शहानशहा बाबरशहाला सहाय्य होण्याच्या बेतांत आहेत. ह्यांच्या बाह्य स्वरूपावर जाऊं नका. यांच्यापैकीं कांहीं तह जुळवून आणण्याच्या खटपटींत आहेत, कांहीं मोहिमेंतून अंग काढून घेण्याचा विचार करित आहेत, किंवा ऐन प्रसंगीं महाराण्याला धोका देवून स्वतःची तुमडी भरण्यासाठीं खुद्द शहाला सहाय्य होऊन हिंदूविरुद्ध लढण्याला तयार होणार आहेत. तेव्हां असल्या देशद्रोही सैनिकांच्या जोरावर यशप्राप्तीची तुह्मी कितपत उमेद बाळगणार? आतां हेंहि ध्यानांत ठेवा, कीं, आमचा बादशहा ह्या तुमच्या घरबुडवे लोकांचा वाजवीहून जास्त फायदा कधींहि घेणार नाहीं! तुमचा महाराणा मोठा सत्य व स्पष्टवादी असून महान् शूर आहे. त्यासाठीं शहा फक्त व्रजभूमीचशी काय, परंतु आणखीहि वाटेल तो प्रांत सोडून देण्याला तयार होईल, व हा तह चिरकालिक व्हावा ह्मणून आणखीहि एक गोष्ट करण्याचें त्यानें योजिलें आहे, असें ऐकतों.

**करणसिंग**—ती कोणती?

**हकीम**—ती तुह्मांला सांगावी कीं नाहीं, याबद्दल थोडी शंका आहे. कारण, तुमच्या राजमंडळांतील कांहीं विशेष व्यक्तींशिवाय इतरांनां ती अद्याप माहीत झाली नाहीं. तरी पण तुह्मी विश्वासाला पात्र आहां ह्मणून ती तुह्माला सांगतों. ( हळू ) महाराण्याची बहीण कमलावती यांचा निका शहाजादा हुमायून यांशीं लावून उभय ज्ञातींचें सख्य जमविण्याची खटपट सुरू आहे.

**करणसिंग**—( क्रोधानें ) काय, काय ह्मटलेंत? प्रियतमा—छे—कमलावतीचा विवाह यवनाशीं! हकीमसाहेब! आपलें हें भाषण शुद्धीवर असून चाललें आहे काय?

**हकीम**—( स्वगत ) कमलावतीच्या विवाहाची गोष्ट निघताच याची इतकी चलबिचल उडाली, यावरून मीं ऐकलेली बातमी खरी ठरते! ( उघड ) हें पहा करणसिंग! चालू काळांत ही गोष्ट जरी धर्मबाह्य वाटली, तरी मी खात्रीनें सांगतों, कीं, ही स्थिति लवकरच पालटेल व हिंदुमुसलमानांतील लग्नविधींचा सुकाळ होईल.

इतकेंच नाहीं, तर या विवाहाला शास्त्राचा आधार काढून दाखविणारे धर्मगुरुहि निपजतील!

**करणसिंग**—चल जा! ह्या तुझ्या भविष्याचा पाढा एखाद्या कुलांगारापुढें वाचून दाखीव! त्याला तें कदाचित् पसंतहि पडेल. सिसोदिया कुलाचे संबंधांत असल्या लांछनास्पद विवाहाची कल्पना मजसारख्या रजपुताला स्वप्नांतसुद्धां खरी वाटणार नाहीं!

**हकीम**—हा नुसता भ्रम आहे. कारण, ह्या संबंधांत तशाच मोठमोठ्यांची मध्यस्थी सुरू आहे व त्यांचें ह्मणणें महाराण्याला ऐकणें भाग पडेल. यासाठीं उठा, जास्त विचारांत पडूं नका. मी एक पत्र देतों तें शहाला दाखवा. कमलावती लवकरच शहाची सून झाल्यावर तिच्या तैनातीला तुमच्यासारख्यांची शहाला फार जरूर पडेल.

**करणसिंग**—( त्वेषानें ) बस्स! तुझें भाषण ऐकून घेण्याची सीमा झाली! काय करूं? हें भाषण बोलणारा तुझ्याशिवाय इतर कोणी असता, तर ही समशेर म्यानांत अशी स्वस्थ पडून राहिली नसती! चल जा, तुझ्या शहाला सांग कीं, कमलावतीच्या विवाहाचें बोलणें लावण्यापूर्वीं संग्रामसिंहाचा तडाखा सहन करण्यासारखें मजबूत चिलखत तयार करण्याचे खटपटीला लाग. येथून निघून जावें हेंच ठीक. प्रातःकाल समीप आला. गुन्ह्याबद्दल शिक्षा भोगिली पाहिजे!

[ जातो.

**हकीम**—( स्वगत ) शाबास रे बहाद्दर! प्रत्यक्ष सुळीं जाण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतांहि मीं सुचविलेल्या प्राणरक्षणाच्या सुलभ उपायाला तुच्छ मानणारा हा महात्माच होय, व अशा कांहीं विभूति रजपुतांत आहेत ह्मणूनच त्यांनीं आमच्यापुढें अद्यापपर्यंत टिकाव धरिला आहे. हाच जर कोणी नीच, कुलांगार असता, तर केव्हांच शेंडीची दाढी बनवून माझ्या गुरुमंत्रानें कान पवित्र करून आमच्या छावणीचा अर्धा मार्ग चालून गेला असता! असलीं स्वार्थपरायण व ऐहिक सुखाला ललचावलेलीं नीच मनोवृत्तीचीं मनुष्यें ह्मणजे आमच्या धर्मप्रसाराचीं सुपीक शेतें, अगर राज्यप्रसाराचीं प्रबळ साधनेंच होत. विशेषसे कष्ट न पडतां टीचभर पोटाची खळगी सुखानें भरावी ह्मणून हे स्वदेश-सेवेसारख्या उच्च कल्पनेला तुच्छ मानून आमची गुलामगिरी आनंदानें पत्करितील. आह्मीं खुष व्हावें ह्मणून आपल्या बहिणी मुली आमच्या गोषांत पाठवितील, व आमच्याकडील एखाद्या हलक्या स्त्रीची क्षणिक मर्जी सुप्रसन्न

करण्यासाठीं धर्मान्तरालाहि प्रवृत्त होतील. ह्या करणसिंगासारख्या कांहीं थोड्या खऱ्या शूर व धर्माभिमानी वीरांचा विचार बाजूला ठेवून ह्या रजपूत लोकांची खरी अंतःस्थिति जर पाहूं गेलें, तर दिवसोंदिवस अगदीं याच प्रकारची बनत चालली आहे. अर्थात्, कालांतरानें यांची जूट कमी होऊन हे परस्परांचे वैरी बनतील व हिंदुस्थानची पातशाहत खात्रीनें आह्मां तुर्कांच्या हातीं येईल. चालू धर्मयुद्धाचा हेतु निराळा असल्यामुळें आह्मी तूर्त सौम्य वृत्तीचा अंगिकार केला आहे, व त्यायोगानें रजपुतांनां तूर्त फायदेशीर असाच तहनामा ठरविण्यांत येईल; परंतु तेवढ्यानें हे चढून जातील व अंतीं नाश पावतील. असो, पुढील विचार बाजूला ठेवून तूर्त करणसिंगाच्या बचावाचा मार्ग शोधिला पाहिजे. त्यासाठीं अगोदर वल्लभाचार्यांची भेट घ्यावी. [ जातो.

---

## प्रवेश चवथा.

[ **स्थळ**—महाराणा संग्रामसिंहाचें शिबिर. राणा तंबूत पलंगावर निजला आहे. जवळच जवानसिंग हत्यारबंद उभा आहे, असा प्रवेश. ]

**जवानसिंग**—कोण आहे ? उभा रहा आणि नांव सांग.

**करणसिंग**—( प्रवेश करून ) मी करणसिंग.

**जवानसिंग**—या वेळीं येथें काय काम ?

**संग्रामसिंह**—( जागा होऊन ) चूप जवानसिंग ! करणसिंगासारख्या बहादूर शिपायाला आमच्या डेऱ्यावर कधींच मज्जाव नाहीं ! आपल्या पहाऱ्याची खबर देण्यासाठीं आला असेल तो. कां करणसिंग ! ( उठून ) काल रात्रींच्या पहाऱ्यांत सर्वत्र शांतता होती हेंच तूं खात्रीनें सांगणार असशील ? ( उल्हासानें ) अरे, चितोडच्या निशाणाचा प्रभावच तसा आहे ! त्याचें सळसळणेंच त्याच्या संरक्षणास बस्स आहे; तुझ्यासारख्या शूर शिपायाच्या सहाय्याची त्याला फारशी अपेक्षा नाहीं.

**करणसिंग**—सरकार ! माझ्या शौर्याची तारीफ व्यर्थ आहे ! माझ्या हातून पहाऱ्याचें काम योग्य प्रकारें झालें नाहीं, व आपलें निशाण चोरीला गेलें, हें सांगणें मला फार शरमेचें आहे !

**संग्रामसिंह**—( खवळून पलंगापुढें उडी मारून ) काय ! चितोडचें निशाण चोरीला गेलें आणि ही गोष्ट तूं जिवंत असतां ? छे, बिलकुल झूट ! ( निरखून ) तुझ्या तोंडावर एक ओरखडाहि नाहीं ! बोल, बोल, स्तब्ध उभा राहूं नको,

काय खरें असेल तें एकदम सांग. माझ्याशीं थट्टा करित असलास तर याद राख! सांग, तुझ्या असत्य भाषणाबद्दलहि एक वेळ क्षमा करीन!

**करणसिंग**—(खेदानें) असत्य भाषण आणि माझ्या मुखांतून? असो. हेंहि मला ऐकून घेतलेंच पाहिजे!

**संग्रामसिंह**—जवानसिंग! जा, तूं स्वतः पाहून ये. ह्याचें डोकें फिरल्यासारखें दिसतें! छेः, असें होणें संभवत नाहीं. हा स्वतः मोठा शूर आहे.

(जवानसिंग जाऊं लागतो, इतक्यांत एक शिपाई धापा टाकित येतो.)

**शिपाई**—महाराज, सरकार! फार वाईट बातमी! आपलें सरकारी निशाण चोरीला जाऊन त्याच्या रक्षणार्थ ठेविलेला सरदार बहुधा मारला गेला असावा. कारण, मोडून पडलेल्या निशाणाच्या भाल्याजवळ रक्ताचा सडा पडला आहे. (करणसिंगाकडे पाहून) पण हा माझ्या डोळ्यांसमोर कोण उभा आहे?

**संग्रामसिंह**—(त्वेषानें) तुझ्या डोळ्यांसमोर हा एक घातकी व राजद्रोही चांडाळ उभा आहे! त्याच्या शरीराचे या खड्गानें तुकडे तुकडे करून टाकतों! (मारावयाला धावतो; परंतु करणसिंगाची गंभीर मुद्रा पाहून मागें होतो.) कायरे! तेथें रक्ताचा सडा पडला होता? बोल, करणसिंग! तुझ्या शौर्याबद्दल माझी खात्री आहे. निशाणाच्या बचावासाठीं त्या चोरांपैकीं कितीजणांना ठार केलेंस–दोघांना–एकाला तरी? अरे, आमच्या बाजूनें शत्रूला एकतरी चांगलासा घाव मारला असें ह्मण, ह्मणजे तुला जीवदान देतों, आणि मग तूं या छावणींतून एकदम काळें कर!

**करणसिंग**—महाराज! आपण मला लबाड ह्मटलें, एवढ्यानेंच माझें तोंड काळें झालें आहे. आपल्या निशाणाच्या बचावासाठीं माझ्याऐवजीं माझ्या इमानी कुत्र्यानें आपलें रक्त खर्च केलें.

**संग्रामसिंह**—शाबास त्या कुत्र्याची आणि धिःकार असो तुझ्या शिपाई पेशाला! (कोचावर बसतो. स्वगत) हा सर्व प्रकार कसा झाला असावा? विश्वासघात व भीति ह्या दोन्ही गोष्टी याच्या बाबतींत संभवत नाहींत. कित्येक लढायांत शत्रूच्या कोटांतून सिंहाप्रमाणें बेशर्त पार पडतांना मीं याला प्रत्यक्ष पाहिलें आहे. आणि विश्वासघातकी मनुष्य निदान माझ्यापुढें तरी इतक्या धिमेपणानें उभा राहूं शकणार नाहीं! (उघड) बोल, करणसिंग! हा प्रकार कसा घडून आला

**करणसिंग**—माझ्या नशीबानें सरकार! यांत सर्वस्वी गुन्हेगार मीच आहें.

**संग्रामसिंह**—ठीक आहे, भोग तुझ्या गुन्ह्याचीं फळें! जवानसिंग, ताबडतोब याला कत्तल करण्याची तजवीज कर.

**करणसिंग**—महाराज—

**संग्रामसिंह**—कां वाचा फुटली होय? क्षमा मागायची असेल तर ती देवाजवळ माग, मजपाशीं नाहीं. कृतघ्ना! केवळ तुझ्या अपराधानें चितोडच्या राण्याला आज खालीं पाहण्याची वेळ आणिली! असला अपराध प्रत्यक्ष आमच्या सख्या भावानें जरी केला असता तरी त्यालादेखील क्षमा झाली नसती!

**करणसिंग**—महाराज! क्षमा आणि ती इहलोकच्या मानवापासून मागणारा मी नाहीं! ईश्वराच्या नामस्मरणापुरता अवधि आपण न दिल्यास त्याचीहि मला पर्वा नाहीं. तोच सर्वांचा उद्धारकर्ता आहे, मला संभाळून घेणें असल्यास घेईल. मरणाची शिक्षा आपण आतां फर्मावा किंवा घटकेनें फर्मावा. मात्र त्यापूर्वी मला एक अत्यंत महत्त्वाची बातमी आपल्या कानांवर घालणें आहे.

**संग्रामसिंह**—बोल, काय बातमी आहे ती!

**करणसिंग**—ती मी एकांतांत सांगूं इच्छितों.

**संग्रामसिंह**—जा तुम्ही सर्व बाहेर! (जवानसिंगाखेरीज सर्व जातात.) जवानसिंग तूं कां उभा?

**जवानसिंग**—सरकार, हा हुकूम माझ्या बाबतींत लागू नाहीं! ह्या दगेखोर सरदाराशीं मी आपणाला एकटें सोडून जाणार नाहीं. "मी एकांतांत बोलूं इच्छितों," एवढेच याचे शब्द मला जास्त संशय येण्याला कारण आहेत. इतका वेळ ही तरवार म्यानांत होती; परंतु आतां ती हातांत उपसलेली राहील! (तरवार उपसतो.)

**संग्रामसिंह**—काय! वेळ पडली तर एका दगेखोराचा समाचार माझ्यानें घेववणार नाहीं?

**जवानसिंग**—तें सर्व खरें; परंतु आपण आधींच आजारी व तशांत निःशस्त्र, आणि हा चांगला धट्टाकट्टा, हत्यारबंद, व राजद्रोहाचा आरोपी. अशा स्थितींत मी येथून एक पाऊलहि हालणार नाहीं.

**करणसिंग**—जवानसिंगाबद्दल माझी हरकत नाहीं. त्याच्या विश्वासूपणाबद्दल माझी पूर्ण खात्री आहे.

**जवानसिंग**—(स्वगत) अर्ध्या घटकेपूर्वी तूंहि तसाच आहेस असें मी समजत होतों.

**करणसिंग**—राजाधिराज–आपणाभोंवतीं सर्वत्र फितुर माजला आहे.

**संग्रामसिंह**—अगदीं खरें! त्याचा अगदीं ताजा दाखला मजपुढें उभा आहे!

**करणसिंग**—तो फितूर अशा तऱ्हेचा आहे, कीं, तो सिद्धीस गेल्यानें आपलें जें नुकसान होईल त्यापुढें शेंकडों निशाणें चोरीस गेल्याचें महत्त्व आपणाला वाटणार नाहीं. ( हळू, कचरत ) सरकार ! आपली भगिनी—

**संग्रामसिंह**—काय–कमलावती ? तिचा काय संबंध यांत !

**करणसिंग**—महाराज ! राणावतजी कमलावती यांचा शरीरसंबंध बाबरशहाचा मुलगा हुमायून याशीं जुळवून आणून तद्द्वारा चितोडच्या सूर्यवंशी कुलास कालिमा व राजस्थानास शांतता आणण्याची खटपट सुरू आहे.

**संग्रामसिंह**—दुष्टा ! निर्लज्जा ! खबरदार त्या सूर्यवंशी सुशील कुमारिकेचें नांव आपल्या तोंडांतून काढशील तर ! तुकडे करीन त्या जिभेचे ! तुझी नजर त्या उच्चस्थानीं पोंहोंचली आहे, हें पूर्वीच आमच्या ध्यानीं येऊन चुकलें आहे; परंतु तुझ्या सद्वर्तनावर भरंवसा ठेवून आजपर्यंत विशेष भानगडींत मी पडलों नाहीं. स्वतःच्या लज्जास्पद कृत्याचा पोवाडा गाऊन विटाळलेल्या मुखांतून त्या पवित्र नांवाचा उच्चार करशील तर याद राख! तुझ्या महत्त्वाच्या बातमीचा आतां पूर्ण खुलासा झाला! "कमलावतीचा विवाह बाबरशहाच्या मुलाशीं," हे शब्द उच्चारतांना तुझी जीभ झडून पडली नाहीं, यावरून ही कल्पना तुझीच अगर तुझ्यासारख्याच एखाद्या नामर्दाची असली पाहिजे, हें खास ! सिसोदिया वंशांतील कुमारिकेचा विवाह यवनाशीं कालत्रयींहि होणार नाहीं हें जसें सत्य आहे, तसेंच असल्या पळपुट्या रजपुतालाहि ती कधीं पत्करणार नाहीं हेंहि खूप समज ! बेहेत्तर आहे, जन्मभर अविवाहित राहिली तर! जा! तिच्याबद्दल तुला फिकीर बाळगण्याचें कारण नाहीं !

**करणसिंग**—महाराज ! मी आतां लवकरच सर्व फिकिरींतून मोकळा होणार आहें, तेव्हां असल्या गोष्टींचा विचार करण्याची मला जरूर नाहीं हें खरेंच; परंतु प्रत्यक्ष सुळावर चढतेवेळींसुद्धां ही गोष्ट आपल्या कानीं घालावयास मी चुकलों नसतों. कारण, राणावतजी कमलावती—

**संग्रामसिंह**—( अंगावर धावून ) पुन्हा त्या नांवाचा उच्चार !

**करणसिंग**—काय ह्मणतां महाराज ! मी त्या नांवाचा उच्चार करूं नको ? चालू घटका माझ्या आयुष्याची अखेरची आहे. यावेळीं त्या परमपवित्र व प्रिय नामोच्चाराला हरकत करण्याची कोणाची छाती आहे ! आपणाला आपल्या प्रचंड ताकदीची घमेंड आहे, ती वाटेल तर या देहावर खुशाल जिरवून घ्यावी. माझ्या मनावर तिचा तादृश परिणाम होणें नाहीं !

**संग्रामसिंह**—बस्स कर तुझी वल्गना! जवानसिंग! याला मजबूत पहाऱ्यांत ठेव. तो पळाला तर तुला मरावें लागेल, समजलास? जा, मात्र त्याचा लष्करी पोषाक तसाच त्याच्या अंगावर अखेरपर्यंत असूंदे. त्याचा गुन्हा जरी मोठा असला तरी त्याचें धारिष्ट व पराक्रम हीं कांहीं कमी नाहींत!

[ जातात.

---

## प्रवेश पांचवा.

[ **स्थळ**—राणी कर्णावतीचा महाल. ]

**राणी**—कांग, त्या करणसिंगाची कांहीं खबर कळली का?

**रामप्यारी**—बाईसाहेब! आपल्या हुकुमाप्रमाणं चंपीला उजाडतांच बजरंग टेंकडीकडे पाठविली. अझून ती कां नाहीं आली, नकळे! काळजी करण्यासारखं कांहीं दिसत नाहीं.

**राणी**—बाई, देव करो अन् तसंच असो. करतांना करून गेल्यें, पण आतां मला फार पस्तावा होतो आहे. छे बाई, त्या वेताळ्यानं काल रात्रीं फारच मूर्खपणा केलान् मेल्यानं! त्याला अगदीं माझ्या त्या खोलीच्याजवळ कीग आणून ठेवलंन् अन् आमच्या वन्सं तर काय! छे, बाई, शर्थ झाली त्यांची! हें सगळं जर स्वारींच्या कानांवर गेलं तर कांहीं धडगत दिसत नाहीं! छे, उद्यां आधीं या वेताळ्याला त्याच्या बायकोसुद्धां हांकून दिलंच पाहिजे.

**कमलावती**—( घाईघाईनें प्रवेश करून ) वहिनी, वहिनी! पाहिलास तुझ्या थट्टेचा परिणाम?

**राणी**—(घाबरून) वन्सं! असं झालं तरी काय? निशाण सुरक्षित आहेना?

**कमलावती**—अग कशाचं निशाण! निशाणहि नाहीं अन् त्याचा संरक्षणकर्ताहि कुठं दिसत नाहीं, असं आतांच माझ्या जवाहीरनं पाहून मला कळवलं. चल, तूं न मी जाऊं. कांहीं तरी दगा आहे. ऊठ—ऊठ—

**राणी**—आल्येंच पण—( गोंधळून ) मला खात्री वाटते, कीं, करणसिंगाला कांहीं धोका झाला नसावा—कदाचित तो आतां कुठं तरी जाऊन निजला असेल—काय नेम बाई, कदाचित् आपण पहाऱ्यावर असून निशाण चोरीला गेलं ह्मणून पळूनहि गेला असेल! पण—वन्सं निशाण तें काय—कापडाचा तुकडाच कीं नाहीं—अं: कदाचित त्याला अम्मळ पहाऱ्यांत ठेवलं असेल. घरीं बसायचं तें तिथं बसलं—आत्तां स्वारींनां सांगून त्याला सोडविलें.

( इतक्यांत एक दासी लगबगीनें प्रवेश करते. )

**दासी**—बाईसाहेब ! वेळ मोठी वाईट आहे. निशाण चोरीला गेलं अन् करण-सिंगावर महाराणाजी फार खप्पा झाले आहेत, व काय शिक्षा सांगतील याचा कांहीं नेम नाहीं ! उठा बाईसाहेब, कांहीं तरी तोड काढा, नाहीं तर गोष्ट मोठी वाईट आहे.

**कमलावती**—चल वहिनी ! आटप तूं आतां. का मीच जाऊं ?

**राणी**—वन्सं आल्येंच पण ! स्वारीकडे जायचं तर अमळ नीटनेटकं तर गेलं पाहिजे. ही पहा आल्येंच ! आई माते कुलस्वामिनी ! तुला जरीची चोळी, लुगडं नेसवीन. आई अंबाजी–तुला सोन्याचा मुगुट वाहीन, तुझ्या नांवानं पांच शुक्रवार करीन–

**कमलावती**—वहिनी, यावेळीं नुसते नवस का करित बसणार तूं ? काय बरं गोंधळ मांडलाहेस हा ? अग, तुझा थाटमाट जरा कमी असला तरीदिखील राणाजी तुला ओळखतील बरं का !

**दासी**—खरंच बाईसाहेब ! उठाच, आटपाच आतां. ही वेळ गेली तर पुन्हा येणार नाहीं.

**राणी**—जात्येंच–जात्येंच, ही पहा चालल्येंच. (स्वगत) असला नव्हता बाई प्रसंग मला कधीं ठाऊक ! छे छे, स्वारी माझं काय करतील न कळे ! मला अभागिनीला कुठून बुद्धि सुचली कुणाला ठाऊक ! (दासींस) कायग सटव्यांनों ! माझा तो निळा शालू कुठं आहे ? काय मेलं–पण कांहो वन्सं ! आपण जाण्यापेक्षां आपल्या पुरोहितांनांच पाठविलं तर ?

**कमलावती**—छे छे वहिनी ! तूंच चल. मूळ खोडी तुझी आहे, तेव्हां तूंच ती निस्तरली पाहिजेस.

**राणी**—( अगदीं गोंधळून ) येत्यें हो–पण जर स्वारी रागांत असली तर कसं बरं करावं ? माझा जीवच घेतील !

**दासी**—छे बाईसाहेब ! भलतीच शंका—महाराजांची वृत्ति खवळलेल्या सिंहाप्रमाणं जरी झाली असली, तरीदिखील आपलं हें सुकुमार शरीर, नाजूक बांधा व चंद्रासारखं मुख पाहून त्यांचा राग तेव्हांच उतरेल.

**राणी**—छेग, मला गोड लागावं म्हणून तूं उगाच कांहींतरी बोलत्येस झालं. आणग माझा तो निळा शालू ! ( दासी हिरवा शालू देते ) वन्सं पाहिलंत, पन्नास वेळा हिला सांगितलं कीं स्वारींनां हिरवा रंग आवडत नाहीं; पण ध्यानांत राहील तर शपथ ! चल जा पहा—तो त्या पेटींतला चंद्रहाराचा करंडाहि आण.

**कमलावती**—काय वहिनी! मनुष्याची प्राण जायची वेळ अन् तुझं या क्षुल्लक गोष्टींकडे लक्ष्य—याला ह्मणावं तरी काय? माझ्यानं नाहीं आतां हें पहावत! तूं पाहिजे तर अशीच स्वस्थ रहा व आपल्या पोषाखाची टापटीप पहा—ही मी चालल्यें महाराणाजींकडे! माझा संबंधच आहे—त्यांनां विचारत्यें, कीं, चितोडच्या घराण्यांतील कुमारिकेचं नांव सांगून एखाद्या शूर शिपायाला त्याच्या कामगिरीवरून फुसलावून त्याच्या कीर्तीस कालिमा लावून त्याला देहांत शासन देववणं हें चांगलं का? चितोडच्या उज्ज्वल कीर्तीला अशानं खग्रास ग्रहण लागणार आहे—चल येऊं नकोस तूं—ही चालल्यें मी.

[जाते.

**राणी**—(दासीला) अग पहात्येस काय, थांबव त्यांनां. छेग बाई, त्या एकट्याच गेल्या अन् कांहींचेवाहीं तिकडे सांगितलं तर! चल चल—

[ जातात.

---

## प्रवेश सहावा.

[**स्थळ**—महाराण्याचा तंबू. राणा कोचावर बसला आहे. समोर मांग हातांत तरवार घेऊन उभा आहे, कोचा शेजारीं राणी-वंशांतील स्त्रिया उभ्या आहेत, असा प्रवेश.]

**राणी**—(भीत भीत पुढें होऊन) ह्मटलं, आमच्याकडे नुसतं पहायचं तरी होतं.

**संग्रामसिंह**—कां, यावेळीं येथें येण्याचें काय कारण?

**राणी**—पण इतकं कशाला रागवायचं तें? त्या मेल्याला आधीं घालवून तरी द्यायचं होतं. मला बाई त्याचं तोंड पाहून कांपरं भरलं आहे!

**संग्रामसिंह**—ए मूर्खा! (राणीकडे न पाहतां) जा बाहेर, पहात काय उभा राहिलास?

**मांग**—सरकार—मुंडकं उडावलं ह्मंजी मंग त्येचं काय करावं ह्यो हुकुम व्हावा.

**संग्रामसिंह**—जा गाडवा, विचारतोस काय! त्याला अग्निसंस्कार देण्याची तजवीज कर, जा. (तो जातो, कमलावती त्याला डोळयानें खूण करिते. तो गेला असें पाहून राणीकडे वळून) आतां सांग बरें वेडे, यावेळीं तुझें येथें काय काम आहे? इतक्या सकाळीं आपल्या महालांत बसून रहायचें सोडून आजारी मनुष्याच्या खोलींत कां आलीस?

**राणी**—हें पहा, मी सर्वस्वी अपराधी आहें, क्षमा करणार आपण समर्थ आहां.

**संग्रामसिंह**—क्षमा आणि ती तुला! हें कोडें मला नाहीं उलगडत.

**राणी**—म्हणजे–मी आपल्या परवानगीशिवाय नाहीं का आंत आल्यें दांडग्यासारखी–त्याबद्दल.

**संग्रामसिंह**—तूं येथें आलीस ह्याला का दांडगाई म्हणायचें, आणि त्याबद्दल क्षमा! (हंसून) फारच बेसूमार दांडगाई ही! प्रात:काळीं सूर्याच्या कोमल किरणांनीं आपण होऊन एखाद्या गरिबाच्या झोंपडींत प्रवेश करणें हा त्यांचा केवढा दांडगेपणा! लाडके, आम्ही ज्या कामांत गुंतलों होतों तें काम तुला पाहण्यासारखें नव्हतें, इतकेंच. बाकी, तूं येथें आल्यानें हा दुखणेकरी आणि त्याच्या भोंवतालच्या सर्व वस्तु पहा कशा टवटवीत दिसूं लागल्या!

**राणी**—पण गडे, खरंच सांगायचं. आपल्याला आतां बरं वाटतंना? (स्वगत) काय बोलावं, कसा आरंभ करावा, कांहीं सुचत नाहीं! (कमलावती तिला डोळ्यानें खुणावते.)

**संग्रामसिंह**—होय, चांगलेंच बरें वाटतें. ह्यावेळीं जरी लढाईला जावें लागलें तरी आमची पूर्ण तयारी आहे. असल्या मोहक वस्तूचें दर्शन झाल्यावर तितकी हुरूप आलीच पाहिजे!

**राणी**—असंच जर आहे, तर माझी एक गोष्ट ऐकलीच पाहिजे! एका गरीब मनुष्याला—जीवदान—

**संग्रामसिंह**—हूं–पुढें बोल—

**राणी**—पुढें काय, त्या करणसिंगाला—

**संग्रामसिंह**—अस्सें अस्सें, ही शिफारस आहे. (कमलावतीकडे पाहून) समजलों, खबरदार त्याचें नांव काढशील तर! तो मेलाच पाहिजे! हुकूम देऊन चुकलों.

**राणी**—असं काय तें, निशाणाचा कपडाच ना काय तो गेला? त्याच्याकरतां इतकी कडक शिक्षा कशाला? हें पहा, मी कीं नाहीं–तसला कपडा पुन्हा आपल्या हातानं तयार करून देईन, त्यावर सुरेख नकशी काढीन, आपण म्हणाल तर माझ्या अंगावरचीं सगळीं मोत्यें‌सुद्धां त्याला लावीन, मग तर झालंना? मग तरी राग जाईलना?

**संग्रामसिंह**—तूं काय बोलतेस तें तुला नीट कळत नाहीं. मोतीं? वः! जगांतील सर्व मोतीं जरीं तूं खर्च केलींस, तरी चितोडच्या राजघराण्याच्या उज्ज्वल कीर्तीला जो छटा लागला आहे, तो बुजून जाईल का? (राणी रडते हें पाहून) संग्रामसिंहाच्या पट्टराणीनें जन्मभर जरी अश्रु ढाळिले, तरी त्या नांवाला लागलेला

काळिमा त्या अश्रूंनीं धुतला जाईल का ? जा, हें तुझें काम नव्हे! यांत मध्यस्थी करूं नको. बायकांचें काम, धंदा व वेळ हीं सर्व पुरुषांहून भिन्न आहेत. स्त्री ही पुरुषाची अर्धांगी आहे असें जरी ह्मणतात तरी ती अशा कामांत नाहीं !

**राणी**—( हळूहळू मागें सरून कमलावतीस एकीकडे ) पाहिलं वन्सं! आतां काय वरं बोलणार? स्वारींचा राग मात्र वाढेल.

**कमलावती**—कांहीं हरकत नाहीं. (पुढें होऊन) महाराज! मी आपली बहीण कमलावती, आपणाजवळ न्याय मागण्याकरितां अर्ज करित आहें; क्षमा करा, असं ह्मणण्याकरितां नाहीं! आणि न्याय मागणाराची दाद घेण्याकरितां राजेलोक नेहमींच दक्ष असतात. त्यांनां अमुकच स्थळ, काळ किंवा प्रसंग पाहिजे असं नाहीं—

**संग्रामसिंह**—ओ! हो!! या आमच्या भगिनी कमलावतीबाई बोलताहेत! (स्वगत) हिचें बोलणें नेहमींच ठसक्याचें असतें. तर मीहि तिच्याशीं तसेंच बोलतों ह्मणजे स्वतःच्या किंवा आमच्या योग्यतेला कमीपणा आणणारी अशी भलतीच एखादी विनंति करण्याला ती आमच्यासमोर पुन्हा कधींच येणार नाहीं !

**कमलावती**—(राणी दाबण्याचा प्रयत्न करित असतां) महाराज! ज्याचा रक्तपात आपण लवकरच करणार आहां, त्या शूर सरदारानं त्याचा काल अनकूल होता त्या वेळीं राजस्थानासंबंधीं मोठमोठ्या कामगिऱ्या बजाविल्या आहेत. हल्लींच्या प्रसंगीं तो कर्तव्यपराङ्मुख झाला ही गोष्ट, त्यानं असं व्हावं, ह्मणून कुणीं तरी केवळ थट्टेनं व मौजेसाठीं त्याला फसविण्याकरितां जाळं पसरिलं होतं यामुळंच झाली; त्याला कुणीं भलत्याच नांवानं—तसं कशाला,—माझ्या नांवानं—खरं बोलायाला काय हरकत आहे?—निरोप पाठविला, आणि ह्मणूनच क्षणभर पहारा सोडण्याचं त्यानं धाडस केलं—अन् यांत नवल तें कोणतं ? या छावणींत असा एक तरी सरदार दाखवा, कीं, माझं नांव ऐकून जो धावून येणार नाहीं? इतर गुणांत मी जरी कशीहि असल्यें, तरी ज्या अर्थी माझा जन्म चितोडच्या राजघराण्यांत झाला आहे, त्या अर्थी माझा इतका मान साहाजिकच राहिला पाहिजे.

**संग्रामसिंह**—एकून तूं त्याची भेट घेतलीस तर ?

**कमलावती**—होय, घेतली. पण ती कां घेतली, हें सांगण्याचा हा प्रसंग नाहीं! मी इथं आल्यें, ती लोकांनां दोष देण्यासाठीं किंवा स्वतःला दोषमुक्त करण्यासाठीं नाहीं.

**संग्रामसिंह**—आणि त्याच्यावर हा अनुग्रह तूं कोठें केलास ?

**कमलावती**—प्रत्यक्ष राणीसाहेबांच्या डेऱ्यांत.

**संग्रामसिंह**—काय राणीच्या—कमाल केलीस! तूं मोठीच धीट व निर्लज्ज बायको दिसतेस! त्याचें लक्ष्य तुझ्याकडे आहे, हें बरेच दिवसांपासून मी जाणतों; परंतु आपल्या कुलाच्या उच्चपणाकडे पाहून तूं या गोष्टीचा विचारसुद्धां करित नसशील, असें मी आतांपर्यंत समजत होतों; परंतु त्या ऐवजीं निर्लज्जे! तूं आपली पदवी व कुळाचा मान विसरून त्या अधमाची भेट घेतलीस, आणि तीहि राणीच्या तंबूत! ह्मणे 'माझं नांव सांगून त्याला कुणीं फसवलं!' शरम नाहीं वाटत तोंड पसरून बोलायला? ध्यानांत ठेव, नांवाचा संग्रामसिंह असेन तर सर्व जन्मभर तुला जोगीण करून टाकीन!

**कमलावती**—महाराज! आपण सत्ताधीश आहां, जें ह्मणाल तें करूं शकाल! परंतु असं झाल्यानं माझ्या अब्रूला यत्किंचितहि कमीपणा येणार नाहीं. मी ह्मणत्यें हें खरं, कीं, खोटं, तें ह्या आपल्या राणीसाहेबांनां विचारा—त्या आपली खात्री करून देतील. परंतु मी इथं दुसऱ्यांनां दोषी ठरविण्याला किंवा स्वतःला दोषमुक्त करण्यासाठीं आल्यें नाहीं, हें मीं आतांच आपणाला सांगितलं आहे. ह्मणून ह्मणत्यें, कीं, जर एखादा मनुष्य मोहांत सांपडून त्याच्या हातून इच्छेविरुद्ध कांहीं अपराध घडला, तर आपण त्याला क्षमा करावी. महाराज! आपणालासुद्धां एक दिवस त्या यमधर्मापुढें याहून घोरतर अपराधाची क्षमा मागावी लागणार आहे!

**संग्रामसिंह**—हें भाषण भगिनी कमलावतीच्याच मुखांतून निघत आहे काय? जिला मी मोठी शहाणी व सुशील समजत होतों तीच कमलावती तूं आहेस, कीं, एखादी कामज्वरानें पीडित झालेली आपल्या जाराचा प्राण वांचविण्याकरितां स्वतःच्या अब्रूचीहि पर्वा न करणारी अशी अन्य स्त्री आहेस? थांब, या क्षणीं त्याचें डोकें उडवून तें तुझ्या तंबूसमोर एका भाल्यावर लटकवून देतों! बेशरम!!

**कमलावती**—ठीक आहे, खुशाल तसं करावं. मग मला बोलायला जागा तरी होईल, कीं, आपल्यासारख्या महान् पराक्रमी राजानं एका शूर सरदाराचा प्राण केवळ क्रूरपणानं व अन्यायानं घेतला! मी ह्मणत्यें, आपल्या गुणग्राहकतेचं तें एक अक्षय्य स्मारकच होईल! आपण त्याला 'जार' ही संज्ञा दिली! असो. आपण महाराणे आहां! परंतु आतां मी आपणाला निक्षून सांगत्यें, कीं, त्यांचं मजवर प्रेम होतं, अगदीं खरं खरं प्रेम होतं, तरीपण त्यांनीं वर डोळा करून मजकडे कधीं पाहिलं नाहीं, कीं, तोंड वर करून भलतासलता एक शब्दहि ते बोलले नाहींत. एखाद्या इष्टदेवतेप्रमाणं ते मजवर एक प्रकारची भक्ति करित असत. आणि त्या खऱ्या खऱ्या प्रेमाकरितां—भक्तीकरितां त्यांनां आज मरावं लागत आहे—

**राणी**—(कमलावतीचा पदर ओढून, एकीकडे) वन्सं, वन्सं! पुरे पण, अशानं स्वारीच्या अंगाचा भडका होईल.

**कमलावती**—कांहीं हरकत नाहीं भडका झाला तर! निष्पाप रजपूत कुमारिका मोठ्या खवळलेल्या सिंहालाहि भीत नाहींत !

**संग्रामसिंह**—कमलावती ! खचित आज तूं शुद्धीवर नाहींस ! तूं कोणापुढें बोलते आहेस याचें भानसुद्धां तुला नाहीं असें दिसतें. ह्या तुझ्या गुरकावणीला भिऊन मी त्या अधमाला सोडून देईन, असें तुला वाटतें ?

**कमलावती**—कांहीं हरकत नाहीं, नाहीं सुटले तर! परंतु ज्याअर्थी या कमलावतीकरितांच त्यांचा प्राण जात आहे, त्या अर्थी त्यांची स्मृति ह्या हृदयांत ठेवून मला जन्मभर रडत बसलं पाहिजे. यापुढं माझ्या लग्नाची गोष्ट काढण्याची मात्र कोणाला जरूर उरली नाहीं ! मी समजेन कीं, माझ्या कपाळीं विवाहसुख लिहिलेलंच नाहीं. कारण, ते जिवंत राहिले तरीसुद्धां आमच्या उभयतांच्या स्थितींतील महदंतरामुळं त्यांचा माझ्याशीं विवाह या जन्मीं लागण्याचा संभवच नव्हता. परंतु मरणानंतर असली पंचाईत रहात नाहीं. ह्मणून मी आजपासूनच त्यांची पत्नी झाल्यें, हें आपण पक्कं समजावं. यापुढं मी जिवंत काय अन् मेल्यें काय सारखंच !

( वल्लभाचार्य प्रवेश करितो. )

**वल्लभाचार्य**—राजा संभाळ. तुझ्या हातून घोर हत्या होत आहे! विचार कर. करणसिंगाच्या वधाचा हुकूम एकदम रद्द कर, त्यांतच तुझें कल्याण आहे.

**संग्रामसिंह**—अरे हें आहे तरी काय? सर्व जगच मजवर उलटल्यासारखें दिसतें ! बायको, वहीण, साधू—त्याचा शिरच्छेद अजून कसा नाहीं पार पडला!

**वल्लभाचार्य**—राजाधिराज ! मी जवानसिंगाला जरा थांबण्याची विनंति केली आहे.

**संग्रामसिंह**—ही तुमची विनंति त्यानें मान्य केली ? आणि आमचा हुकूम धाब्यावर ठेवला ! बरें, बोला, काय आहे आपलें ह्मणणें ?

**वल्लभाचार्य**—राजा ! ह्या करणसिंगासंबंधीं एक गुप्त गोष्ट मला माहीत झाली आहे; परंतु ती त्याच्या परवानगीशिवाय मी कोणास हल्लींच्या स्थितींत सांगूं शकत नाहीं. ती तुला समजली, तर तूंहि त्याचा वध करणें मना करशील, यांत शंका नाहीं. तरी तूर्त माझ्या वचनावर भरंवसा ठेव, आणि दिलेला हुकूम रद्द कर.

**संग्रामसिंह**—साधुमहाराज! आपण कोण आहां हें मला माहीत नाहीं! तरी पण तें गुप्त काय आहे, हें जर आह्माला कळेल तर प्रसंगीं योग्य तेंच आह्मी करूं. मात्र केवळ आपल्या साधुपणावर भरंवसा ठेवून त्याला क्षमा करण्याला आह्मी तयार नाहीं.

**वल्लभाचार्य**—राजन्! हा कालपर्यंत सर्व आयुष्य गोपालकृष्णाच्या सेवेंत खर्च केलें, जगाला तृणवत् मानिलें, व केवळ व्रजभूमीचा उद्धार व्हावा ह्या हेतूनें तुमच्यांत पडलों, तो काय अनृत बोलण्याकरितां? राजा, सर्वकर्ता श्रीकृष्णपरमात्मा समर्थ आहे. करणसिंगाचें मरणच त्याला इष्ट असेल तर आह्मां मानवांचे त्याला वांचविण्याचे प्रयत्न व्यर्थ आहेत. परंतु जर त्याच्या आयुष्याची दोरी खंबीर असली, तर ती तुझ्यासारख्या उन्मत्त राजाच्या हिसक्यालाहि दाद देणार नाहीं, हें पक्कें समज. संग्रामसिंहा! तुझी दृष्टि इतकी कशानें फिरली? हाच तुझा सुस्वभाव आणि हाच तुझा न्याय आं! धिक्कार! धिक्कार असो तुला व तुझ्या मंदबुद्धीला!

**संग्रामसिंह**—(निरखून) हं हं, वल्लभाचार्य साधु ते आपणच वाटतें? आपणाविषयीं येथें दररोज निरनिराळ्या गप्पा कानीं येतात; आपली कृति पिशाचवत् आहे असेंहि ऐकतों; परंतु हा संग्रामसिंह पिशाचांनां भिणारा नव्हे, समजलांत! मी आजारी आहें अशी संधि पाहून या राजमंडळानें मला नकळत बाबरशहाशीं तह करण्याकरितां एक खलिता तयार करून तो त्या हरामखोर करणसिंगांच्या हातीं एका साधूकडे पाठविला होता, ते साधू आपणच नाहीं का? ठीक ठीक, चालूंद्या आपलीं तहाचीं बोलणीं. त्यांत आमच्या नांवाचा उच्चार कराल तर मात्र याद राखा! त्या करणसिंगाचा–तुमच्या वकिलाचा–निकाल झटपट लावण्याची व्यवस्था स्वतः लावतों! जा, निघा माझ्यासमोरून! मध्यस्थी करायला जमले आहेत! सगळा चोरांचा बाजार!

**वल्लभाचार्य**—संग्रामसिंहा! पुन्हा एकदा सांगतों, विचार कर. मदांध होऊन ह्या दुष्कर्माला प्रवृत्त होत आहेस, पश्चात्ताप पावशील! पहा, या करणसिंगाऐवजीं स्वतःचा एखादा अवयव गळून पडता तरी बरें झालें असतें, असें तुला वाटेल! संभाळ, दूरदृष्टीचा उपयोग करण्याची हीच वेळ आहे. अझून आटोक्याबाहेर गेलें नाहीं!

**संग्रामसिंह**—बस्स करा तुमचा वेदांत! एकदम चालते व्हा! चितोडच्या सिंहाचा अपमान–आणि सूड उगविण्याला इतकी दिरंगाई! चला, निघा! जा, आपापल्या कामाला.

( हकीम प्रवेश करतो. )

**हकीम**—तोबा, तोबा. असलें वर्तन महाराण्याच्या दर्जाला उचित नाहीं!

**संग्रामसिंह**—( स्वगत ) हा हकीमहि बहुधा याच कामांत आमचा अंत पाहणारसें दिसतें !

**हकीम**—कांहीं अत्यंत जरूरीच्या कामांत हुजुरांपाशीं बोलावयाचें असल्यामुळें एकांतीं भेटीची अपेक्षा आहे.

**संग्रामसिंह**—( स्त्रियांस व साधूस ) हं जा. कमलावती जा, अक्षरसुद्धां बोलूं नकोस ! जरा डोकें शांत कर. त्याला दोन प्रहरपर्यंत मारित नाहीं, जा. निघा. घोटाळूं नका.

[ जातात.

**वल्लभाचार्य**—( जातां जातां ) राजा संग्रामसिंहा ! धि:कार असो तुझ्या पराक्रमाला! तपस्व्याचा उपमर्द! अरे, तुझ्या हितचिंतकांचा अपमान! ठीक आहे! तूं प्रत्यक्ष भगवंताचा अंश आहेस. सहन केलें पाहिजे; परंतु ध्यानांत ठेव, तुझा अधिकार तुला परांच्या मऊ बिछान्याप्रमाणें जरी सुखकर भासत असला, तरी त्याच बिछान्याच्या वरच्या बाजूस केसाला बांधिलेली नागवी समशेर लटकते आहे !

**संग्रामसिंह**—( स्वगत ) या वेड्या पिरांनां त्यांच्या मठींत डांबून टाकण्याची व्यवस्था लाविली पाहिजे; त्यांनां वाटेल तेथें संचार करूं देणें बरें नव्हे ! ( उघड ) कां हकीमसाहेब ! आपली काय मर्जी आहे ?

**हकीम**—हुजूर! कदमापाशीं एक विनंति आहे. काल आपणावर कठिण वेळ होती–प्रत्यक्ष आपला जीव धोक्यांत होता; परंतु अल्लाच्या कृपेनें माझ्या औषधाचा आपणास गुण पडून संकटाचें निवारण झालें. तेव्हां माझ्या हातून आपणास जसें एक प्रकारें जिवदान मिळालें तद्वतच आपणहि—

**संग्रामसिंह**—एका इसमास ह्मणजे करणसिंगास जिवदान द्यावें–मला वाटलेंच !

**हकीम**—हुजुरांनीं माझा हेतु बरोबर ताडला.

**संग्रामसिंह**—( स्वगत ) काय भगवदीच्छा असेल ती असो ! या हकीमानें माझ्या तंबूंत पाय ठेविल्याबरोबर त्याचा उद्देश चटकन् डोळ्यांपुढें उभा राहिला –मोठी चमत्कारिक गोष्ट आहे ! या यःकश्चित् करणसिंगानें अपराध केला व माझ्या अधिकारान्वयें मी त्याला योग्य ती शिक्षा देत आहें, तर त्यांत हजारों

विघ्नें आड येत आहेत! आजपर्यंत असले शेंकडों अपराधी मीं आपल्या हुकुमानें मारविले असतील; पण आजच्यासारखा प्रसंग कधींच आला नाहीं! पहा, एक मागें होतो तों दुसरा पुढें सरसावतो. बायको, बहीण, साधू, हकीम–जणों काय माझ्या क्रोधाचा पाडाव करण्यासाठीं शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन रथी महारथीच समरांगणावर येत आहेत!( हंसतो.)

**हकीम**—हंसत्या मुखांतून नेहमीं आनंदकारकच भाषण निघतें. मला वाटतें, हुजुरांनीं माझा अर्ज मंजूर केला.

**संग्रामसिंह**—ह्या एका मनुष्याऐवजीं तुमच्या जातीचे जे हजारों कैदी आमच्याजवळ आहेत त्यांनां सोडून देण्याविषयीं कां नाहीं मागणी करीत? बिचारे आपल्या बायकामुलांनां आनंदानें भेटतील व तुह्माला दुवा देतील. ह्या एकट्याला वांचविण्यांत तुह्माला काय फायदा?

**हकीम**—तसाच फायदा असल्याशिवाय हुजुरांला तकलीफ देण्यासाठीं आलोंच नसतों!

**संग्रामसिंह**—असल्या संदिग्ध व डावपेंचाच्या बोलण्यावर मी भरंवसा ठेवित नसतों. तुमचे मजवर उपकार झाले आहेत, त्यांची फेड अन्य प्रकारें शक्त्यनुसार केली जाईल; परंतु असल्या राजकीय न्यायाच्या प्रकरणांत मी कोणालाहि ढवळाढवळ करूं देणार नाहीं! ज्यानें अपराध केला त्याला शिक्षा झालीच पाहिजे!

**हकीम**—सरकार! बोलतों याची माफी असावी. आपण राज्यारूढ झाल्यापासून आपल्या हातानें बरींच अविचाराचीं व अन्यायाचीं कामें झाल्याविषयीं मीं ऐकिलें आहे. तसेंच, आपल्याहातून आजपर्यंत हजारों लोकांचे प्राणहि हरण करण्यांत आले आहेत. ही सर्व प्राणहानि न्याय्यच होती असें आपणाला ह्मणतां येईल काय? ध्यानांत आणा, कीं, इतक्या प्राणहानीला आपला न्याय आडवा आला नाहीं, आणि फक्त एकच जीव–व तोहि विनमोल–वांचविणें आपणाला किती कठीण पडत आहे! यावरून आपल्या मनाचा थोरपणा व्यक्त होतो!

**संग्रामसिंह**—( रागानें ) प्रत्येक मनुष्यानें आपली पाहिरी सोडून भलत्या कामांत न पडण्याची खबरदारी ठेविली पाहिजे. तुमचा धंदा वैद्यकीचा आहे, यासाठीं तद्व्यतिरिक्त दुसऱ्या भानगडींत तुह्मीं पडणें रास्त नाहीं!

**हकीम**—चितोडच्या प्रतापी व थोर राण्यापासून त्याच्या प्राणरक्षकाला हेंच बक्षिस काय? ( ताठ्यानें ) संग्रामसिंहमहाराज! आपणहि खूप समजून रहा, जेथें जेथें ह्मणून तुमचें नांव मशहूर आहे अशा प्रत्येक राजदरबारापासून तों यःकश्चित्

खेड्यापाड्याच्या चवाठ्यापर्यंत या आपल्या कृतघ्नपणाचा बोभाटा मी जातीनें करीन! इतकेंच नाहीं, तर तुमच्या दुष्टपणाची स्मृति जगाचा लय होईपर्यंत कायम राहील अशी व्यवस्था करीन!

**संग्रामसिंह**—(तरवारीस हात घालून) हे शब्द आणि ह्या—संग्रामसिंहाशीं ? जिवाचा कंटाळा आला होय ?

**हकीम**—हुजूर! ही माझी गर्दन तयार आहे. आपली समशेर खुशाल चालवावी! नुसत्या शब्दांहून कृतघ्नतेच्या कृत्यांची आठवण जास्त काल टिकते!

**संग्रामसिंह**—( तोंड फिरवून स्वगत ) कृतघ्नपणा—मोठाच आरोप हा! माझ्या कीर्तीला हा शोभत नाहीं. बस्स, तसेंच! ( उघड ) हकीमसाहेब—तुमची मागणी मीं कबूल केली. वस्तुतः ह्या ऐवजीं आमच्या मुगुटाचीं रत्नें मीं जास्त खुशीनें दिलीं असतीं. असो. जा, त्या करणसिंगाला घ्या आपल्या ताब्यांत. वाटेल तर त्याला आपला गुलाम करा! (परवाना देतों.) हा घ्या परवाना. जवानसिंगाला दाखवा—म्हणजे तुमचें काम होईल. मात्र तो काळतोंड्या पुन्हा आमच्या दृष्टीसमोर न येण्याची खबरदारी घ्या.

**हकीम**—मी हुजुरांचा अत्यंत आभारी आहें. अखेरचें एवढेंच मागणें आहे, कीं, वंद्यावर सदोदित अशीच कृपा असावी.

[ सलाम करून जातो.

**संग्रामसिंह**—किती दुराग्रही स्वभाव या हकिमाचा! निशाणासंबंधीं हा काय चमत्कार आहे, याचा उलगडा होत नाहीं. निशाणाचा चोर तर माझ्या ध्यानांत आला; परंतु करणसिंगाला पहारा सोडण्याचें कारण काय झालें ? बरें, यांत आमच्या स्त्रियांचा संबंध काय असावा? व तो वल्लभाचार्य आणि हा हकीम हे तरी ऐन वेळेवर येथें कसे दाखल झाले? मेळ कोठेंच बसत नाहीं! याचा फार बारकाईनेंच तपास केला पाहिजे. कोण आहे रे बाहेर?(भालदार येतो.) जा जवानसिंगाला बोलाव! (भालदार जातो.) ह्या कामांत गजसिंगाचाच मला संशय येतो. ठीक आहे, नांवाचा संग्रामसिंह असेन तरच याला धूळ खायाला लावीन!

**जवानसिंग**—( प्रवेश करून ) सरकार! हुकुमाप्रमाणें करणसिंगाला हकीमाच्या स्वाधीन केलें.

**संग्रामसिंह**—ठीक झालें. आतां असें कर, कीं, आपणाबरोबर एक शिंगाड्या घे, आणि तडक गजसिंगाच्या डेऱ्यावर जा. ही त्याची जेवणाची वेळ आहे. सर्व मानकरी वगैरे त्याच्याभोंवतीं जमले असतील. एकदम आंत जा. थेट गजसिंगा-

समोर–मुजरा वगैरे करण्याची जरूर नाहीं–आणि त्याला मी सांगतों तसें खडखडीत बोल. ह्मणावें--गजसिंग ! गेल्या रात्रीं तुह्मीं स्वतः किंवा दुसऱ्या कोणा-कडून चितोडच्या निशाणाचा कपडा चोरून नेला. यासाठीं या घटकेपासून एक तासाच्या आंत तो जशाच्या तसा मोठ्या थाटानें वाजतगाजत नेऊन बजरंग टेंकडीवर फडकवण्याची व्यवस्था करा. शिवाय, आमच्या निशाणाच्या बाजूस तुह्मीं स्वतःचें निशाण पटका खालीं करून रोंवावें, व ज्या नीचाच्या सल्ल्यानें तुह्मीं हें कृत्य केलें, त्याचें मुंडकें एका भाल्याला टोंचून तोहि शेजारीं उभा करावा. व इतकें झाल्यावर दांतीं तृण घेऊन तुह्मीं स्वतः शरण यावें, तरच तुह्माला या गुन्ह्याची माफी मिळेल !

**जवानसिंग**—आणि हें सर्व त्यानें अमान्य केलें तर ?

**संग्रामसिंह**—पुरतें ऐकून घेशील कीं नाहीं? हें कबूल नसेल तर आमच्या-बरोबर सामना करण्याला तयार हो ह्मणावें. स्वतःला मदतीसाठीं आपल्याकडील दोन पराक्रमी सरदार आणिलेस तरी आमची हरकत नाहीं. सामना कोठें, केव्हां, कसा, शस्त्रें वगैरे सर्व तुझ्या मर्जीवर आहे, व खरा शिपाई बच्चा नसशील तरच माघार घेशील! जा–अगदीं शब्दशः असें बोलून निघून ये !

**जवानसिंग**—सरकार! आपसांत कलह न करण्याची आपण शपथ घेतली आहे!

**संग्रामसिंह**—( संतापून ) तुला काय त्याची पंचाईत ? सांगितलें काम करायचें सोडून मला शहाणपणा शिकवितो आहे ! आजकाल जो पहावा तो कांहीं सांगितलें कीं हुजत घेत बसतो! जा, आमचा निश्चय झाला तो झाला. या गोष्टींत सर्व राजस्थान मजवर उलटलें तरी त्याची पर्वा नाहीं ! चल–जा !

**जवानसिंग**—हा निघालों सरकार !

( वल्लभाचार्य प्रवेश करितो. )

**वल्लभाचार्य**—थांब, येथून हालूं नको. तुझ्या कामगिरीचा काय परिणाम होईल याचा राण्यानें योग्य विचार केला नाहीं. ( राण्यास ) संग्रामसिंहा, मूर्खा ! विचार कर, मला तुझ्या आदरातिथ्याची जरूर नाहीं–ह्या तुझ्या उद्धट व खुनशी निरोपानें काय अनर्थ ओढवतील याची तुला कल्पना नाहीं! ज्या थोर व धार्मिक उद्देशानें तुह्मी सर्व येथें एकत्र झालां, तो तूंच विसरलास काय? एवढ्याचकरितां का या सर्व सैन्याच्या आधिपत्याचा तूं स्वीकार केलास? येथें आपसांत कलह न करण्याची तुह्मीं शपथ वाहिली, तीं मोडण्यांत तूंच अग्रेसर होतोस, आं? अरे हें किती

विपरीत! विचार कर आणि असला निरोप पाठविणें रहित कर. अरिष्टें तुझ्यापुढें आ पसरून उभीं आहेत--

**संग्रामसिंह**--अरिष्टें हीं मला खेळगड्यासारखीं आहेत, त्यांनां भिणारा संग्रामसिंह नाहीं, हें खूप समजा! साधुमहाराज, आपलीं कामें निराळीं आहेत तीं सोडून राजकारणांत मन घालण्याची आपणाला जरूर नाहीं! तीं आमचीं आह्मांलाच करूं द्या.

**वल्लभाचार्य**—राजा! मी भलत्या कामीं पडलों, असें समजूं नकोस. दूरवर नजर दे. यावेळीं तुझा काळ प्रतिकूळ आहे, व प्रसंगवशात् तुझ्या कीर्तीला व सुखाला धक्का बसण्याचा संभव आहे.

**संग्रामसिंह**—हें पहा, ह्या पोकळ गोष्टी मला सांगूं नका. त्यांवर भरंवसा ठेवून धैर्य खर्चूं देण्याइतका भोळसर मी नाहीं!

**वल्लभाचार्य**—राजा! ह्या गोष्टी पोकळ नाहींत. माझें भाषण कालत्रयीं खोटें होणार नाहीं. वस्तुतः या तुमच्या भानगडींत पडून मला फायदा हाच कीं, तुझ्यासारख्या गर्विष्ठ व उद्दाम राजाचे शब्दप्रहार सहन करावे. असो. श्रीकृष्ण-परमात्म्याची मर्जी! माझें तूर्त पहाणें इतकेंच, कीं, या धर्मयुद्धाचा गोड निकाल लागून तुह्मीं सर्वांनीं सुरक्षितपणें आपल्या देशीं परत जावें व एवढ्याकरितांच ही तुझी मनधरणी.

**संग्रामसिंह**—एकंदरींत सर्व दोष तुह्मी माझ्याच माथीं मारतां—जाऊंद्या, तुह्मी ह्मणतां तर हा निरोप मी पाठवित नाहीं; परंतु माझा जो नुकताच अपमान झाला त्याची काय वाट?

**वल्लभाचार्य**—त्याबद्दलहि योग्य तजवीज होईल. गुन्हेगार शोधून काढण्या-विषयीं राजमंडळाची खटपट सुरू आहे.

**संग्रामसिंह**—परंतु हें कृत्य गजसिंगानेंच केलें, असा मला बळकट संशय असला तर?

**वल्लभाचार्य**--संशयनिवृत्तीसाठीं व तंटा जास्त न वाढावा यासाठीं आपण सांगाल तें दिव्य करण्यास गजसिंग तयार होईल.

**संग्रामसिंह**--काय! तो आमच्याशीं द्वंद्व करील?

**वल्लभाचार्य**—आपसांत युद्ध न करण्याची सर्वांबरोबर त्यानेंहि शपथ घेतली आहे.

**संग्रामसिंह**--बरीच पथ्यावर पडली ही शपथ त्याच्या! आणि वस्तुतः त्याच्याशीं द्वंद्व करून जय मिळविण्यांत मोठीशी कीर्तिहि नाहीं! तरी पण ही दिव्याची कल्पना ठीक आहे. दिव्य करण्याचे निरनिराळे अनेक मार्ग आहेत. त्यांतले एकदोन त्यानें स्वीकारले तरी आह्माला पसंत आहे. काय, तो तापून लाल झालेला खिळा मुठींत धरील? अथवा निखाऱ्यांवरून चालत जाईल?

**वल्लभाचार्य**—अरे, अरे, काय हा पोरकटपणा!! संग्रामसिंह, थोडी तरी लाज वाटूंदे रे तुला! काय हे तुझे विचार! अरे, तुह्मीच जर आपापसांत एकमेकांची अशी हेलना करूं लागलां, तर तुह्मांला कोण मानील? संग्रामसिंह! तूं इतका थोर, सर्वगुणसंपन्न व सर्व राजस्थानचा मुगुटमणि असा असून तुझ्या कल्पना इतक्या हलक्या असणें, खरोखर तुला मुळींच शोभत नाहीं! वनराज सिंहाची शक्ति जरी तुझ्या अंगीं असली तरी त्याचा दुष्ट स्वभाव तुझ्याठायीं असणें हें फार वाईट! तुझ्या हातून प्रजेवर अत्यंत उपकार झाले आहेत त्याबद्दल तुझी कीर्ति दिगंत पसरून चिरकाल राहील; परंतु तूं जर आपला वर्तनक्रम बदलणार नाहींस, तर तुझ्या अंगांत भरलेला ताठा, अभिमान व मद हेच तुला विघातक होतील, व तुझ्या कष्टांनां सीमा रहाणार नाहीं!

[ जातात.

[ पडदा पडतो. ]

## अंक चवथा.

### प्रवेश पहिला.

[**स्थळ**--बाबरशहाची छावणी. एका महालांत करणसिंग स्वतःशींच बोलत फेऱ्या करित आहे, असा प्रवेश.]

**करणसिंग**—दैवा! तुझी गति विचित्र आहे. एका दिवसापूर्वी ज्या भावी सुखाच्या मनोराज्यांत मी गढून गेलों होतों, तेथून आज मला एकदम दुर्दशारूपी खोल दरींत तूं झुगारून दिलेंस—अं! आजपर्यंतची दिगंत कीर्ति कुठें आणि हा कर्तव्य-पराङ्मुखोद्भव काळिमा कुठें! कुठें तो स्वदेशसेवेचा विमलध्वज आणि कुठें हें यवनांचें लज्जास्पद दास्य! राजद्रोहाचें खापर माथ्यावर घेऊन या देहाची धिंड मिरविण्यांत काय शोभा! जन्मदात्या मातापितरांचा निरोप घेऊन मोहिमेंत सामील होतांना दृष्टीपुढें जो दिव्य प्रकाश दिसत होता, त्याऐवजीं आतां घोर अंधःकार पसरला आहे! यापुढें जगण्यांत काय अर्थ! मलिन झालेली कीर्ति उज्ज्वल करण्याचीं साधनें कुठें आहेत! या तुर्कांच्या हातून मिळेल तो तुकडा खाऊन त्यांच्या गुलामगिरींत काळ कंठण्यापेक्षां आत्महत्या करणें काय वाईट!! इहपरलोकीं भ्रम झालेल्यास निदान इहलोकच्या कष्टमय स्थितींतून पार होण्याला तरी हें एक सुलभ साधन आहे! धर्मयुद्धासारख्या परम पवित्र कार्यांत अपूर्व कीर्ति—निदान धारातीर्थीं मरण—इच्छिणाऱ्या रणशूराला आत्महत्येचा मार्ग स्वीकारण्याची पाळी यावी अं!! (थांबून) समजा, येथून परत जाण्याची परवानगी मिळाली, तरी काय उपयोग? मला पाहतांच सर्व रजपूतसेना छीःथू करील व लहान पोरांपासून मोठमोठ्या राजेरजवाड्यांपर्यंत मी एक निर्लज्जपणाचा मूर्तिमंत पुतळा आहें असें समजतील! कोणत्या आशेच्या लाटेवर विश्वास ठेवून मी या धर्मयुद्धांत सामील झाला व कोण हा घोर परिणाम! यांत दोष तरी कोणाचा? दुसरा कोणाचा! माझा—माझाच! परमेश्वरा!! या दोषाचा सर्व भार माझ्याच शिरावर राहूं दे! त्या निष्कलंक राजकन्येवर याचा यत्किंचित अंशहि जाऊं देऊं नकोस, एवढीच माझी तुला प्रार्थना आहे! (पाहून) दिवस बराच वर आला—पण आतां रात्र काय आणि दिवस काय—(चपापून) दरवाजाला धक्के कोण देत आहे?

(**पडद्यांत**— आंत येण्याची इच्छा आहे.)

**करणसिंग**-- आमच्या धन्याचा शब्द दिसतो. दरवाज्याला आंतून कडी नाहीं. दासाच्या खोलींत प्रवेश करण्याला धन्याला परवानगी मागण्याची जरूर नाहीं!

( **पडद्यांत**-- मी धन्याच्या नात्यानें आलों नाहीं. )

**करणसिंग**--हकीमाच्या नात्यानें आलां असाल. बिमाऱ्याच्या खोलींत जाण्याला हकीमाला सदर परवानगी आहे.

( **पडद्यांत**—मी त्याहि नात्यानें आलों नाहीं. )

**करणसिंग**—तर मग शुद्ध मित्रत्वाच्या नात्यानें तरी आलां आहांतच. मित्रालाहि परवानगीची जरूर नाहीं.

( **पडद्यांत**—पण मी मित्रत्वाच्या नात्यानें आलों नसलों तर? )

**करणसिंग**—( स्वगत ) कोण द्राविडी प्राणायाम हा! (उघड) आपणाला वाटेल त्या भावानें या. आपणाला मना करण्याची माझी इच्छा नाहीं व ताकदहि नाहीं!

**अमीर**--( प्रवेश करून ) तर मग हा पहा तुझा जुना शत्रु शेरकोह!

**करणसिंग**--काय! मी खरोखरीच जागृतावस्थेंत आहें? काय हें सादृश्य! छे:, मी झोंपेंत आहें–झोंपेंत! ( डोळे मिटतो ) हा प्राणी हकीम असावासा वाटतो; परंतु (डोळे उघडून) आतां तोच निराळ्या रूपानें दिसतो. असा फरक कसा झाला? मित्रा अमिरा–छे हकीमसाहेब–तेंहि नाहीं! माझ्या दृष्टींत असा फरक कसा झाला? माझें स्वतःचें स्थान व स्थिति पालटली ह्मणून सर्व जगानेंहि आपल्या रूपांत फेरफार केला काय?

**अमीर**—( हंसून ) अगदीं बरोबर! जसे आपण तसेंच जग!

**करणसिंग**—ह्मणजे?

**अमीर**—ह्मणजे–माझ्याच तोंडून वदविण्याचा आपला हेतु असेल तर मजकडून हरकत नाहीं! हें पहा, मनुष्याला ज्या प्रसंगीं जसें काम करावयाचें असेल तसा त्यानें आपला वेष व स्थिति पालटणें जरूर आहे. तुमच्या रजपूत सैन्यांत माझा एक स्नेही आहे. वास्तविक त्याचा जन्म एका प्रसिद्ध राजकुलांत झाला असून स्वतःला या धर्मयुद्धांत खूप शौर्य गाजविण्याला संधि सांपडावी ह्मणून तो एखाद्या कनिष्ट प्रतीच्या सरदाराच्या वेषानें येथें राहिला; इतकेंच नाहीं, तर त्यानें आपली सर्वच स्थिति अशी पालटली, कीं, तो वास्तविक कोणत्या दर्जाचा पुरुष असावा, याची कल्पनाहि कोणाला होणार नाहीं. तोच प्रकार माझ्याहि संबंधांत लागू पडतो. लढण्याच्या वेळीं मी चिलखत घातलेला शेरकोह होतों! परंतु वैद्यकीच्या संबंधांत मला हकीमाचा वेष चढवावा लागला, यांत आश्चर्य काय!

**करणसिंग**—बरें, त्या तुमच्या मित्राची गोष्ट फक्त तुह्मालाच माहीत आहे, कीं, सर्वत्र ती प्रसिद्ध झाली आहे?

**अमीर**—नाहीं, नाहीं, ती फक्त मला व आणखी एकालाच माहीत आहे व योग्य प्रसंगाशिवाय बाहेर फुटणार नाहीं. कारण, आज तो थोड्या संकटांत आहे; असो. त्या माझ्या मित्राची आपणाला फार काळजी लागल्यासारखी दिसते!

**करणसिंग**—खरेंच सांगा, आपणालाहि मी राजद्रोहीच वाटतों का ? माझ्या हातून चूक झाली आहे हें खरें; परंतु इमानीपणांत मी लवलेशहि कमी झालों नाहीं.

**अमीर**—आपण आतां मजवर भरंवसा ठेऊन स्वस्थ रहा. तूर्त प्राणसंकटां-तून तुह्मी मुक्त झालांत. आतां फक्त तुमची अब्रू साफ करणेंच राहिलें, व त्याचीहि मीं युक्ति योजिली आहे. अगोदर हे मळके जुने कपडे काढून हे नवे चढवा.

**करणसिंग**—( कपड्यांकडे पाहून ) छे, छे, हेच बरे आहेत. ते उंची कपडे मला शोभणार नाहींत. आपल्या एखाद्या गुलामाचे कपडे मला द्या, ते मी खुषीनें घालीन.

**अमीर**—करणसिंगजी ! असे निराश होऊं नका. अल्ला अझूनहि तुह्माला पूर्वीचे दिवस दाखवील. असा धीर सोडण्याचें कारण नाहीं. तुमच्याबद्दल मला पूर्ण काळजी आहे. बसा खालीं. मी कांहीं महत्त्वाच्या गोष्टी तुमच्यापाशीं बोलणार आहें. ( बसतात ) तुमच्यासंबंधीं एका नाजुक गोष्टीची हकीगत मला समजली आहे; परंतु ती एक वेळ तुमच्याकडून कळावी, असा हेतु आहे.

**करणसिंग**—बोला, आपल्यापासून कांहींच गुप्त राहणार नाहीं, व तें ठेवण्याचीहि माझी इच्छा नाहीं.

**अमीर**—मी असें ऐकतों, कीं, संग्रामसिंहाची परम रूपवती व सद्गुणी बहीण कुमारी कमलावती इच्यावर तुमचें प्रेम जडलें आहे.

**करणसिंग**—इतकेंच नाहीं, तर तिचेंहि मजवर प्रेम आहे; परंतु आतां त्याचा उल्लेख कशाला ? माझें हें कृष्णवदन त्या उज्ज्वल कुमारिकेचें नांव उच्चारण्याला योग्य नाहीं.

**अमीर**—असे निराश होऊं नका. तुमची खात्री असेलच, कीं, वायफळ गोष्टी करित बसणारा मी नव्हें ! तुमच्या नांवाला लागलेला कलंक धुतला जाऊन तुमची कीर्ति पूर्वीहून सतेज व्हावी व ह्या प्रेमसंबंधांतहि तुह्माला पूर्ण यश यावें, एवढ्याकरितां मीं एक छानदार मसलत योजिली आहे. मात्र ती वठविण्यांत तुह्मीं आपली हुशारी दाखविली पाहिजे.

**करणसिंग**—मित्रा ! असा जर कधीं समय येईल, तर फार काय सांगूं—माझे आईबाप व ईश्वर मी तुलाच समजेन ! हल्लींच्या स्थितींत तरी तीं सर्व मला अंतरलीं

आहेत व तुझ्या सहाय्यानें जर तीं भेटणार तर त्यांपेक्षां तूं फार श्रेष्ठ आहेस. बोल, काय करूं ?

**अमीर**—असा उतावीळ होऊं नकोस. तुझा शेऱ्या कुत्रा तुला आठवतो का?

**करणसिंग**—त्याला मी कसा विसरेन ? ( डोळे पुसतो. )

**अमीर**—हें काय ! वाईट वाटण्यासारखें काय झालें ! तो हल्लीं सुधरत चालला आहे, व आणखी दोनचार दिवसांत पूर्वीसारखा हुशार होईल.

**करणसिंग**—तुझे उपकार मी कसे फेडूं ? हें पहा, माझा शेऱ्या स्वतःच्या जिवाहूनहि मला प्यार आहे.

**अमीर**—मी सांगतों ऐक. तुझा कुत्रा फार तीक्ष्ण बुद्धीचा आहे, यासाठीं ज्यानें त्या रात्रीं त्याला घायाळ केलें त्याला तो प्रसंगीं ओळखूं शकेल.

**करणसिंग**—अगदीं खात्रीनें !

**अमीर**—बरें, रजपुतांच्या छावणींत त्याला ओळखणारे किती लोक आहेत?

**करणसिंग**—कांहीं फारसे नाहींत. त्यांतले त्यांत माझा खासदार त्याच्या जास्त परिचयांतला; परंतु मला शिक्षा होण्यापूर्वींच पत्रें देऊन मीं त्याला घरीं रवाना केलें.

**अमीर**—परंतु तुला सर्वच ओळखतील, नाहीं का ?

**करणसिंग**—(दुःखानें) हो, हल्लींच्या स्थितींत मला राण्यापासून तों शिरच्छेद करण्याच्या मांगापर्यंत सर्व ओळखतात !

**अमीर**—तें असूंद्या. काल संग्रामसिंहाकडून आमच्या शहाकडे फार मोठा नजराणा आला, व त्याबरोबर एक वामनमूर्ति नकली जोडपें त्यानें पाठविलें आहे, व त्याच्या भाषणानें शहा फार खुष झाला. तसलेंच एखादें मौजेचें साधन परत भेटीदाखल महाराण्याकडे पाठवावें, असें शहाच्या मनांत आहे व त्यासाठीं मीं तुझी व तुझ्या कुत्र्याची योजना केली आहे.

**करणसिंग**—ह्मणजे ?

**अमीर**—ह्मणजे इतकेंच कीं, तुला एका जादुगार शिद्दी गुलामाचें सोंग देऊन व तुझ्या कुत्र्याचाहि रंग पालटून राण्याकडे पाठवून द्यावयाचें. तुझ्या शब्दावरून तुला कोणी ओळखील, यासाठीं तूं मुक्याचें व्रत पत्कर. हें जर तुझ्याकडून होण्यासारखें असेल तर पुढें तेथें जाऊन काय करायचें, तेंहि सागतों.

**करणसिंग**—कां नाहीं होणार ? तूं सांगशील तसें करायाला मी तयार आहें.

**अमीर**—तूं शिद्याचें सोंग घेऊन राण्याकडे जा. खुद्द त्यानेंच तुला आपल्या नोकरींत ठेवावें, अशाबद्दल व तुझ्या अद्भुत जादूगिरीबद्दल बादशहा आपल्या खलित्यांत शिफारस करील. जादूचा उपयोग व मंत्र तुझा कुत्रा बरोबर असल्यानें प्रत्यक्ष तुला शिकविण्याची जरूरी नाहीं. याशिवाय आणखीहि एक कामगिरी तुला तेथें गेल्यावर करावी लागेल. सकृद्दर्शनीं ती तुला जरी अगदीं विपरीत भासली, तरी तिचा हेतु कळल्यावर तुझें समाधान होईल. तुमच्या राजमंडळांतील कांहीं मतलबी लोकांनीं आमच्या शहानें शहाजाद्यासाठीं कमलावतीची मागणी करावी, अशी त्याला गळ घातली आहे. प्रथम शहाला ही गोष्ट कबूल झाली; परंतु इतक्यांत तुझा माझा स्नेहसंबंध झाला व तुझ्या प्रेमाची सर्व हकीगत मला कळली, त्यामुळें ही गोष्ट मीं शहास कळवून त्याचें मन वळवलें. शिवाय, राजमंडळाची सूचनाहि कोणत्या धोरणानें पुढें आली होती, हेंहि तो जाणतच होता. सारांश काय, कीं, तुझी कमलावती तुलाच मिळावी, असें त्याचेंहि मत पडलें आहे. परंतु राजमंडळालाहि एकदम नाउमेद करणें चांगलें नाहीं. यासाठीं त्यानें असें योजिलें आहे, कीं, कमलावतीस एक पत्र लिहून तें तुझ्या हातीं तिच्याकडे पाठवावयाचें. पत्रांतील मजकूरहि राजमंडळाचे इच्छेप्रमाणेंच असेल. तुमचा मानी महाराणा व त्याची बहीण असल्या संबंधास कधींच अनुकूल होणार नाहींत; ही देखील बादशहाची खातरी आहे; परंतु ह्या एकंदर व्यवस्थेंत थोडी मौज होऊन अखेर कमलावती तुलाच माळ घालील, हें मी तुला खात्रीनें सांगतों. चल तर आपण पुढील उद्योगाला लागूं.

[ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ **स्थळ**—महाराण्याचा तंबू. ]

**संग्रामसिंह**—कसें काय पुरोहित महाराज ! राजमंडळाचे काय विचार सुरू आहेत ?

**पुरोहित**—महाराज ! आपली प्रकृति चांगली झाली, यानें सर्वांस आनंद झाला आहे, व आतां युद्धकांडाची अखेर लावण्याचा त्वरित उपाय कोणता हें पाहण्याकडे सर्वांचीं मनें लागलीं आहेत.

**संग्रामसिंह**—कां, इतकी घाई कां ?

**पुरोहित**—घाई कां ? राजन् ! आपण जाणतच असाल, कीं, आजकाल या मोहिमेची स्थिति कोणत्या प्रकारची आहे! आरंभींची जूट आतां नाहींशी झाली, कलह बळावला, स्वार्थ पुढें आला व परमार्थाचा पूर्ण विसर पडला. एवंच केवळ बाहुबलानें व्रजभूमि आपल्या हातीं येणें आतां असंभाव्य दिसतें. शत्रु दिवसेंदिवस जोरावत चालला व त्याच मानानें आपल्या राजमंडळाची निराशा व भीति वाढत जाऊन त्यांनीं ही मोहिम सोडून परत स्वदेशीं जाण्याचा बेत केला आहे.

**संग्रामसिंह**—सर्व राजमंडळाचें या संबंधांत अगदीं एकमत आहे, कीं, याला कांहीं अपवाद आहेत ?

**पुरोहित**—छे, छे, अगदीं एकमत, मात्र प्रत्येकाची मोहीम सोडण्याची तऱ्हा निरनिराळी दिसते.

**संग्रामसिंह**—ती कशी काय ?

**पुरोहित**—राणा मेघसिंह यांचें ह्मणणें असें, कीं,अगोदर महाराणाजींस त्यांच्या देशीं पोंहोंचविल्याशिवाय आपण स्वदेशीं जाणार नाहीं. त्यांच्या पदरचे मानकरी वगैरे याच मताचे आहेत. जयपुरचे राणा गजसिंह यांचा पक्का निश्चय झाला आहे कीं, ज्या सैन्यांत आपण प्रमुख आहां त्यांत त्यांनां मुळींच राहणें नाहीं. राजमंडळांतील इतर राणे व लष्करी वडेवडे हुद्देदारहि ह्यांत सामील आहेत. रणशूर सखावत व कणावत ज्ञातीचे पुढारीहि बिथरलेलेच दिसतात. तेव्हां, एकंदर स्थिति लक्ष्यांत आणून मोहीम पुढें चालवावयाची किंवा कसें, याचा आपण पक्का निश्चय ठरवावा, ह्मणजे तो मी राजमंडळास कळवीन.

**संग्रामसिंह**—(स्तब्ध राहतो; स्वगत) असें काय! हें भविष्य मीं पूर्वीच करून ठेविलें होतें. (उघड) जा, आपण त्यांनां सांगा, कीं, तुह्मी स्वतः जो निश्चय केला तो उत्तम आहे. असले शेंदाड शिपाई जवळ असण्यापेक्षां ते दूरच राहतील तितके बरे!

**पुरोहित**—राजन् ! आपण थोडा शांतपणें विचार करा. एकदा हे राजे निघून गेले, ह्मणजे आपलें बळ कमी होईल व व्रजभूमीची मुक्तता बाजूला राहून स्वतःवरच कठीण प्रसंग येईल. नुसत्या हातापेक्षां ह्या मोडक्या तरवारी खात्रीनें जास्त उपयोगी पडतील! आपण त्यांची अशी हेलना करूं नये. वास्तविक पाहतां या लोकांच्या नाराजीचें बीज यांतच आहे. पुष्कळांचा आपणावर असा आरोप आहे, कीं, आपण आपला अधिकार चालवितांना मर्यादेबाहेर जातां व एकंदरींत आपलें वर्तन आग्रहाचें व मानहानि करणारें आहे.

**संग्रामसिंह**—पुरोहित ! आपण वडील आहां, आमचे कुलगुरु आहां, तेव्हां आपण वाटेल तें बोललांत तरी, मला ऐकून घेतलें पाहिजे व तुह्मी मला जो दोष देतां तोहि कबूल केला पाहिजे. माझा स्वभाव उतावळा व संतापी आहे खरा; परन्तु हें त्याला वाजवीहून जास्त शासन होत आहे. रागाच्या आवेशांत माझ्या तोंडून क्वचित् एखाददुसरा कठोर शब्द बाहेर गेला असला ह्मणून तेवढेंच मनांत ठेवून ऐन भरांत आलेली ही पवित्र उद्देशाची मोहिम सोडून या राजमंडळानें घरचा रस्ता सुधरावा, हें त्यांनां उचित आहे काय ? असो. त्यांची तशीच इच्छा असेल तर त्यांनीं खुशाल जावें. मी एक तर व्रजभूमि सर करीन, अगर आपल्या अस्थि येथेंच टाकीन !

**पुरोहित**—आपण कदाचित् तसें कराल; परंतु त्यासाठीं रजपुत शिपायांचें रक्त यापुढें खर्ची पडूं द्यावयाचें नाहीं, असा राजमंडळाचा हेतु दिसतो.

**संग्रामसिंह**—बाबरशहाशीं तह जुळविण्याचा बेत दिसतो तर एकूण ?

**पुरोहित**—हो, तसेंच समजावें. कारण, खुद्द शहाच्याच मनांतून ही लढाई बंद करण्याचें दिसतें, व तो व्रजभूमीसंबंधी आपल्या सर्व अटी कबूल करित आहे.

**संग्रामसिंह**—फारच उत्तम ! परंतु ही अत्यंत आश्चर्याची गोष्ट आहे. मोठ्या निकराच्या लढाया मारून तरी आह्मी जास्त काय मिळविणार ! तशांत, हल्लींच्या स्थितींत तर हा तह बेअंदाज फायदेशीर मानला पाहिजे. तथापि हें मला खरें वाटत नाहीं; कारण, अद्यापपर्यंत शहाची बाजू कोठेंच ढिली पडल्याचा रंग दिसत नाहीं.

**पुरोहित**—यांत थोडा नाजुक भाग आहे. शहाच्या मनांत आपणाला जवळचे संबंधी करून घ्यावें असें आहे, व तसें झालें तर ह्याशिवाय आणखीहि आपल्या कांहीं अटी असल्यास तो मान्य करील.

**संग्रामसिंह**—संबंधी—अगदीं जवळचा ! आतां उजेड पडला. याचें मला स्वप्न पडलेंच होतें ! कोण बरें तो ? ज्वरानें मेंदू फार हलका झाला—मला वाटतें तो जयपुरवाला, छे, तो हकीम—नाहीं साधू—नाहीं—तो करणसिंग—होय तोच ! आमची प्रिय भगिनी आणि यवनाला द्यावयाची क्लृप्ति काढणारांचीं डोकीं अचाट खरीं !

**पुरोहित**—कोणतीहि गोष्ट आपल्या इच्छेविरुद्ध घडवून आणण्याचा माझा मुळींच इरादा नाहीं. यवनांच्या घरीं रजपूत बेटी देण्याची रीत आज जरी विशेष प्रचारांत नाहीं, तरी लवकरच ती तशी होईल याबद्दल मला खात्री वाटूं लागली आहे.

**संग्रामसिंह**—अगदीं खरें! आपली ही फार दूरदर्शीपणाची सल्ला आहे! असल्या लग्नाचें उपाध्येपण आपणच पतकरणार, असें मलाहि वाटूं लागलें आहे. नुसत्या अर्धचंद्रावर ते तृप्त नाहींत. आमच्या सूर्याशीं बरोबरी करण्याची इच्छा त्यांनां झाली आहे–पण हा विजोड होईल! त्यांच्या योग्य असा अर्धचंद्रच त्यांनां दिला पाहिजे. पुरोहितजी! या राजमंडळाच्या नेभळेपणाचा संसर्ग मलाहि बाधा करूं लागला, असें म्हटलें पाहिजे. पहा, यापूर्वी जर एखाद्या इसमानें माझ्याजवळ हीच गोष्ट काढिली असती, तर मी त्याला तेथच्या तेथें लाथेखालीं तुडविला असता. अथवा तुमच्यासारख्या एखाद्या वयोवृद्ध ब्राह्मणानें हाच बुद्धिवाद पुढें आणिला असता तर तत्क्षणीं त्याची निर्भर्त्सना केली असती; परंतु यावेळीं मला तसें कांहीं वाटत नाहीं. इतकेंच नव्हे, तर उलट पक्षीं यांत विचार करण्यासारखें कांहीं आहे, असेंहि वाटतें. कारण, असें पहा, प्रत्यक्ष पाठच्या भावांप्रमाणें मानलेले हे सर्व राणे महाराणे आपलें पवित्र कार्य सोडून जर विश्वासघातकी बनूं पाहतात, तर आह्मीं तरी यांच्या नादीं लागण्याऐवजीं त्या शूर, उदार व थोर शहाशीं संबंध कां करूं नये? असो. थोडें शांतपणें घेतलें पाहिजे. या राजमंडळांत चेतना उत्पन्न करण्याचा एक अखेरचा उपाय करून पहावा. तोहि फसला, तर आपली पोक्त सल्ला आहेच निदानची! चला तर, सर्व मंडळाला आतांच्या आतां दरबारांत पाचारण करा, व आह्मीहि येतों. सर्व दुनिया आह्माला मानी व तापट ह्मणतेना–ठीक आहे, आतां तुह्मी अगदीं त्याच्या उलट प्रकार पहाल.

[ जातात.

---

## प्रवेश तिसरा.

[**स्थळ**—दरबारचा भव्य तंबू. राजमंडळाचे सर्व सभासद आसनावर बसले आहेत. मध्यभागीं एक जागा रिकामी आहे, असा प्रवेश. ]

**मेघसिंह**—कां पुरोहित महाराज! राणा संग अद्याप आले नाहींत. राजमंडळाचे उद्देश ऐकून अंगाचा भडका झाला असेल, नाहीं?

**पुरोहित**—छे, बुवा! आज कांहीं अपूर्व प्रकार नजरेला आला. संग्रामसिंहाच्या तब्बेतींत विलक्षण फरक पडला आहे. जेथें ज्वालामुखीचा स्फोट होऊन धरणीकंपाचे प्रचंड धक्के बसण्याचें भय होतें, तेथें सर्वत्र अगदीं प्रशांत आढळलें.

**विदूषक**—अहो, तर मग तो ज्वालामुखी आतां या दरबारांत पेटणार असेल. चला, आपण येथून यःपलाय करावें, हाच शहाणपणा!

**तुवर**—आपणा सर्वांना जमून बराच वेळ झाला; परंतु राणा संग ह्मणे येताहेत! जशी कांहीं आमच्या वेळेला किंमतच नाहीं! बरोबरच आहे, त्यांनीं आमची पर्वा कां करावी? जेथें प्रत्यक्ष मेघसिंह, गजसिंह यांसारखे मूग गिळताहेत, तेथें आमचा काय पाड!

**जैतसिंग**—( तुवरास बाजूस ) अहो महाराज! ही चिथावणी आतां पुरे करा!

**तुवर**—चोराच्या उलट्या ह्मणतात त्या अशाच!

**गजसिंह**—संग्रामसिंहाचें नांव निघालें ह्मणजे माझ्या पायांची तिडीक मस्तकाला जाते. याचें एवढें स्तोम ह्या मेघसिंहांनीं वाढविलें!

**गप्पीदास**—( बाजूस ) आमच्या महाराजांनीं बोलण्यांत ऐट खूप आणिली आहे, परंतु संग्रामसिंहाचें नांव उच्चारतांना छातींत पहा काय घडामोड झाली आहे!

**मेघसिंह**—गजसिंहजी! या बाबतींत मी तुमचें बोलणें कबूल करणार नाहीं! जसे चार तुह्मी, तसाच मी संगाच्या ताठ्याला व बेपर्वाईला ताळ्यावर आणण्याला तुह्मी तयार असल्यावर मीहि मागें हटणार नाहीं. मात्र एकट्यानेंच कोणतीहि गोष्ट अंगावर घेऊन करण्याला मी तयार नाहीं.

**गजसिंह**—हेंच जर खरें आहे, तर आतां राणा संग येथें आल्यावर त्याला कोणीहि खडी ताजीम देतां कामा नये.

**जैतसिंग**—अगदीं रास्त बोललांत! असें चरचरीत अंजन मिळाल्या-शिवाय त्याची धुंदी उतरणार नाहीं! शिवाय, या सभेंतील आजच्या कारभारांत कोणतीहि गोष्ट त्याच्या इच्छेवर अवलंबून ठेवावयाची नाहीं. आह्मांला ही मोहीम नको व ह्या राण्याचा उद्दामपणाहि सहन करणें नको!

**गजसिंह**—आह्मीं या मोहिमेला आज शेवटचा रामराम ठोकणार! संगराण्यानें वाटेल तर एकट्यानें लढावें, अगर आपली बहीण शहाला देऊन संधि करून घ्यावी.

**तुवर**—(बाजूस) खाशी! निशाणाच्या बाबतींत जसा नकशा उतरला, तशीच ह्या मोहिमेच्या निकालांतहि त्याची फजितीच उडाली पाहिजे!

**जैतसिंग**—(बाजूस) चुप चुप–निशाणाचें नांव काढूं नकोस! तुलाच ह्मणून सांगतों, आपण करून गेलों खरें–परंतु आतां पश्चात्ताप होत आहे! संग्रामसिंहाच्या तोंडाकडे पाहण्याची छातीच होत नाहीं!

**तुवर**—अगदींच भेकड दिसतोस! अरे, भिण्याचें कारण असेल तर तें मला! तूं काय केलें आहेस? हा गजसिंह आपणाला आड पडदा आहेना?

**उदयसिंह**—महाराज, आपण हें काय चालविलें आहे ? या आपापसांतील द्वेषरूपी विषवृक्षाला असेंच वाढवित बसाल तर त्याचीं कडू फळें आपणा सर्वांला चाखावीं लागतील. ज्या पवित्र कार्यासाठीं आपण सर्व येथें जमलां आहां, तें मातीला मिळून तुमच्या क्षात्रतेजाला अशानें अक्षय्य कालिमा लागेल, हें ध्यानांत आणा. महाराणा संग्रामसिंह यांच्या अंगीं दोष असतील; परंतु त्यांची कार्यदक्षता व पराक्रम किती जबर आहे, याचा विचार करा व आजपर्यंत चालू असलेल्या क्रमांत अडथळा आणूं नका.

**गजसिंह**—अहो रावळ ! आपलें हें संग्रामसिंहस्तोत्र पुरे करा ! ह्मणे त्याची कार्यदक्षता व शौर्य जबर आहे ! येथें आह्मीं बांगड्या नाहीं भरल्या, समजलें ? बस ! आह्मांला या मोहिमेंत यापुढें रहाणें नाहीं ! चला, जयपुरचे सर्व सरदार व मानकरी हो ! आतां राणा संग येथें आल्याबरोबर त्याच्या समोरून मुजरा न करितां एकदम निघून जाऊं.

**पुरोहित**—अहो अहो, असळ आवरतें घ्या–राणाजी आले !

( वाद्यें वाजतात व संग्रामसिंह वगैरे प्रवेश करितात. सर्व एकदम उभे राहून खडी ताजीम देतात. गजसिंहाची मंडळी चडफडत तसेंच करिते. )

**संग्रामसिंह**—प्रिय बांधव हो ! आपणा सर्वांना भेटण्याचा सुयोग परमेश्वर कृपेनें आज आल्यामुळें माझें हृदय आनंदानें उचंबळत आहे; परंतु हा योग अखेरचाच होतो कीं काय, अशी धास्ती उत्पन्न झाल्यामुळें मला तितकेंच वाईट वाटत आहे ! ज्या थोर व पवित्र हेतूनें आपण इतके दिवस कष्ट भोगित येथें राहिलां, तो हेतु साध्य होण्यापूर्वींच आपण आपल्या घरचा रस्ता सुधरावा, हें राजस्थानच्या शुभ्र कीर्तीस कालिमा आणणारें होईल. ह्मणून माझी आपणां सर्वांनां विनंति आहे, कीं, जर आपल्या कार्याआड येणाऱ्या कांहीं खाजगी भानगडी उपस्थित झाल्या असतील, तर त्यांच्या निरसनार्थ परस्परांनीं आपापल्या चुका येथें कबूल कराव्या व हातांत हात घालून आपला पवित्र हेतु नेटानें तडीस लावण्याच्या ईर्षेनें येथून परत फिरावें. महाराज ! आपण जाणतच आहां, कीं, हा संग्रामसिंह केवळ शिपाई गडी आहे. याचा जोर मनगटांत आहे, मुत्सद्दीपणांत नाहीं ! अर्थात्, याच्या जिव्हेला मोहक भाषणाचें वळण नसून प्रसंगवशात् ती त्याच्या धंद्याची सहाय्यकारिणी होते; परंतु एवढ्याचकरितां ह्मणून त्याच्या अविचाराच्या भाषणाचा व कृत्यांचा रोष मानून आपण हें पवित्र कार्य सोडून जाऊं नका, व इहलोकीं कीर्ति व परलोकीं अक्षय्य सुख मिळण्याचीं साधनें

झुगारून देऊं नका! ह्या संग्रामसिंहाकडून आपणापैकीं कोणाचा अपराध झाला असल्यास तसें कळवा, ह्मणजे शब्दांनीं व कृतीनें तो आपली क्षमा मागण्यास तयार होईल. कां मेघसिंहजी! माझ्या हातून आपली कांहीं आगळीक झाली आहे का? ( हात पुढें करितो. )

**मेघसिंह**—छे, छे! हें काय! असें आपण मनांतसुद्धां आणूं नये! आपल्या-बद्दल माझ्या मनांत यत्किंचितहि दुजाभाव नाहीं. आतां, या मोहिमेबद्दल माझे विचार बदललें आहेत हें जरी खरें आहे, तरी त्याला माझीं केवळ खासगी कारणें आहेत. आपल्या वर्तनाचा वगैरे कोणताच संबंध नाहीं!

**विदूषक**—( गप्पीदासास ) बोका सन्याशी कोणाला ह्मणतात, हें तुला माहीत आहे?

**संग्रामसिंह**—बरें गजसिंहजी! आपला तर माझ्यावर मोठाच राग आहे; परंतु थोडा विचार कराल, तर मला चीड येण्यासारखें वर्तन आपल्या हातूनहि झालें आहे, हें आपल्या ध्यानीं येईल. असो. झालें तें झालें. आपण परस्परांची क्षमा मागूं व या राजसमूहाची जूट कायम ठेवण्याचा प्रयत्न करूं. आपल्याला माझी एवढीच विनंति आहे, कीं, जर माझें नुकतेंच नाहींसें झालेलें निशाण आपण कोणाच्या सांगण्यावरून घेतलें असेल, अगर कोणीं आणून तें आपल्यापाशीं दिलें असेल, तर तें जशाचें तसें मला परत द्या. ह्मणजे त्या दिवशीं आपल्या निशाणाचा माझ्या हातून जो उपमर्द झाला, त्याबद्दल मीहि सर्वांसमक्ष आपली क्षमा मागेन.

**गजसिंह**—( गोंधळून स्वगत ) कांहीं सुचत नाहीं. मनांतून तर खूप जोराचें भाषण बोलावेंसें वाटतें, परंतु हा समोर असतां तें तोंडाबाहेर येऊं शकत नाहीं.

**विदूषक**—(बाजूस) लठ्ठ उंदीर आणि भुकावलेला बोकोबा! अथवा उडाण-टप्पू विद्यार्थी आणि करडा तात्या पंतोजी यांचाच मासला हा!

**पुरोहित**—महाराणाजी! आपल्या निशाणाच्या संबंधांत गजसिंह अगदीं निर्दोष आहेत. त्यांनीं ह्याबद्दल मजपाशीं शपथ घेतली आहे.

**संग्रामसिंह**—तर मजकडून मोठीच चूक झाली ह्मणायची. असो, याबद्दल गजसिंह महाराजांची मी क्षमा मागतों. ( पुढें जातो )

**गजसिंह**—आतां माझ्या जिवांत जीव आला.

**संग्रामसिंह**—बरें, कसें काय राजा सिलौदी तुवर व राव जैतसिंग! आपला तर मजवर राग नाहींना? असेल, तर स्पष्ट सांगा. मी आपली क्षमा मागण्याला तयार आहें.

**जैतसिंग**—राग कसला, आणि आला तरी कोण विचारतो आमच्या रागाला? तरी पण मी एवढेंच ह्मणतों, कीं,धर्मयुद्धाच्या कीर्तीचा सर्वच भाग आपण बळकावल्यासारखा दिसतो, यासाठीं त्याचा थोडा हिस्सा तरी इतरांनां द्यावयाचा होता!

**संग्रामसिंह**—असें असें! ( स्वगत ) येथें पाणी मुरतें आहे.

**तुवर**—इतकेंच नाहीं, तर याहून जास्त दोष मी महाराणाजींच्या अंगीं दाखवूं शकेन. महाराणाजी! आपल्यासारख्यांचे दोष मीं दाखविण्याचा प्रयत्न करणें हें जरी अमळ अप्रशस्त दिसेल, तरी ते जर कोणींच दाखविणार नाहीं, तर त्यापासून आपणा सर्वांची हानि होणार आहे. महाराणा संग्रामसिंहजींच्या शौर्याची व साहसाची वाहवा करावी तितकी थोडी आहे; परंतु त्याच्या जोरावर जेव्हां तेव्हां ते आमच्यासारख्या स्वतंत्र रजवाड्यांवर वाटेल तसें तोंडसुख घेतील, अगर अनियंत्रित सत्ता गाजवितील, तर तें मात्र कधींहि ग्राह्य होणार नाहीं. महाराणाजींच्या अंगीं जबर ताकद आहे, व खजिन्यांत विपूल द्रव्य आहे, ह्मणून ते आह्मांला सर्वस्वीच बुचाडूं पहातील व अधिकाराच्या तोऱ्यांत आह्मांला वाटेल तसें वागवितील, प्रेमाच्या गोड भाषणाला त्यांच्यापाशीं मुळींच स्थान मिळणार नाहीं, व लहानथोर सर्वांनां एकजात आपल्या तैनातींतील खासगी नोकरांच्याच दावणीला बांधितील, तर त्यांचा अधिकार असह्य झालाच पाहिजे! हे माझे शब्द महाराणाजींस अप्रिय वाटतील हें मी जाणतों; परंतु खरा प्रकार जाणण्याची महाराणाजींनींच इच्छा दर्शविल्यामुळें मी आपलें कर्तव्य बजावित आहें व त्याच्या खरेपणाची साक्ष आपणा सर्वांची आनंदी मुद्राच देत आहे. आपण सर्व भिडस्त आहां व मी स्पष्टवक्ता आहें ( खालीं बसतो. सर्व नेत्रसंकेतानें त्याची वहावा करितात. )

**संग्रामसिंह**—( स्वगत ) काय करूं! या दांभिक तुवराला येथल्यायेथें लोळविला असता; पण प्रसंग निराळा पडला. याचेच दांत याच्या घशांत घालण्याला आपण अमळ पडत्या बाजूचाच आश्रय केला पाहिजे, जहाल जाऊन उपयोग नाहीं! ( उघड ) एकूण, आपण सर्व राजेरजवाडे माझ्याशीं नाराज आहां. माझ्या स्वभावांतील किरकोळ दोषांकडे माझे बंधुवर्ग इतकी करडी नजर पुरवितील, अशी कल्पनाहि आज तागायत मला नव्हती. माझा स्वभाव उतावळा आहे व एखाद्या अवचट प्रसंगीं आपली सल्ला घेण्याची वाट न पहातां स्वतःच्या जबाबदारीवर मीं अधिकउणें हुकूम सोडिले असतील; परंतु असल्या क्षुल्लक व निर्हेतुक अपराधांनीं आपलीं मनें इतकीं बिथरून जाऊन आणिबाणीच्या वेळीं आपण हें पवित्र कार्य सोडून द्यावें व तेंहि केवळ माझ्या दोषांमुळें, हें पाहून मला अत्यंत

दु:ख होत आहे. आजपर्यंत माझ्या हातून जी कांहीं सेवा झाली, तिनें माझे दोष झांकले गेले असतील, अशी मीं व्यर्थ आशा केली. प्रत्येक बिकट संग्रामांत सर्वांच्या अग्रभागीं प्राणांची पर्वा न ठेवितां मीच लढलों व मागें हटण्याच्या वेळीं सर्वांच्या मागें राहिलों. लढाई मारून जय मिळविल्यावर—रणमैदानांत मीं जरी आपला ध्वज उभारिला असला तरी त्या पोकळ भूषणाशिवाय इतर गोष्टींत मीं आपलें मन ठेविलें नाहीं. लढाईत सांपडलेली लूट वांटून घेतांना माझी कोणाला आठवण झाली काय ? राजेरजवाडे हो ! एखाद्या शहराला मीं आपलें नांव दिलें असेल; परंतु त्याची सत्ता आपल्यापैकींच कोणी तरी बळकावली नाहीं काय ? एखाद्या प्रसंगीं शत्रूवर तुटून पडण्याचा तुमच्या इच्छेविरुद्ध मीं आग्रह धरला असेल, तरी स्वत:च्या जिवाची पर्वा न ठेवितां लढलोंहि आहें ! प्रसंगविशेषीं तुमच्या शिपायांनां अधिक-उण्या शब्दांनीं बोललों असेन; अथवा रागाच्या झपाट्यांत वाजवीहून जास्त कडक शिक्षाहि केली असेल; परंतु त्यांनां झालेल्या जखमा बऱ्या करण्यासाठीं पैसा व श्रम खर्चण्यांतहि मीं मागें पाहिलें नाहीं. ह्या सर्व गोष्टींची आठवण फक्त मलाच राहून आपणा सर्वांनां त्यांचा पूर्ण विसर पडावा, ह्याहून दुर्दैव तें कोणतें ? असो. यापुढें तरी कांहीं चांगली तजवीज करा, व अंगिकारिलेलें कार्य दृढनिश्चयानें शेवटास न्या. संग्रामसिंहाचा गर्व, ताठा, उद्दामपणा व महत्त्वाकांक्षा यापुढें तुमच्या मुळींच आड येणार नाहींत ! आपणासारखे महान् शूर व पराक्रमी राजे एका अत्यंत पवित्र कार्यासाठीं एकवटले असतां माझ्या एकट्याच्या अविचारामुळें व दोषामुळें त्रस्त होऊन त्यांचें ऐक्य नष्ट व्हावें व स्वीकृत कार्य अर्धवट सोडण्याची त्यांनां वेळ यावी, हें ह्या डोळ्यांनीं पहाण्यापेक्षां मीच स्वत: तुह्मां सर्वां-पासून वेगळें रहावें, हें बरें ! सेनापतीचा सर्व अधिकार मी स्वसंतोषानें या क्षणीं सोडून देतों, व ज्या दुसऱ्या कोणाला तो द्याल त्याच्या हाताखालीं निमूटपणें सेवा करितों. हें मी अगदीं अंत:करणपूर्वक बोलत आहें, व त्याची सत्यता पहाणें असेल तर हा पहा मी आपला डावा हात ह्या उजव्या हातानें कापून तुमच्यापुढें ठेवितों! (सर्व मना करितात.) इतकेंहि करून जर खरोखरच मोहिमेचा तुह्मांला कंटाळा आला असेल, व तुमच्या नाजुक शरीराला चिलखताची पीडा सहन होत नसेल, तर तुह्मीं सर्व मिळून निदान दहापांच हजार सैन्य तरी मला द्या, आणि आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें व्रजभूमि सर झालीच तर तेथें एक जयस्तंभ उभारून त्यावर मी आपणा सर्वांचीं नांवें खोदवीन. मग तरी आपणांला संतोष होईल कीं नाहीं ?

**उदयसिंह**—शाबास संग्रामसिंहजी! आपण खरे सेनानायक आहां! बंधूंनो! विचार कसचा करितां? क्षुल्लक कारणें उकरून काढून तंटे माजविण्याची ही वेळ नव्हे! ह्मणा (सर्व घोष करितात) संग्रामसिंह महाराज की जय! चला, उपसा आपल्या समशेरी! (सर्व उठतात व वाद्यें वाजतात. गजसिंहाच्या कटाची मंडळी खेरीज करून सर्व आनंदी दिसतात.)

**संग्रामसिंह**—वीर हो! तुमचा हा उत्साह पाहून आपली सर्व सेना वीरश्रीनें तटाटून जाईल व बाबरशहाच्या छातींत धडकी बसेल! चला—मागें घेऊं नका. हा सिंह तुमचा पुढारी असल्यावर अपेशाचें नांवहि नको! माझ्या आडदांड वर्तनानें तुमच्या क्षुब्ध झालेल्या मनाला शत्रूच्या रक्तानें शांत करितों. तुर्कांबरोबर तात्पुरता तुह्मीं केलेला तह आजपासून रद्द झाला, असें बाबरशहास तावडतोब कळवून रणमैदानावर सामन्याला तयार होण्याबद्दल त्याला पाचारण करा. चला, ईश्वराचें नांव घ्या आणि आपल्या पराक्रमानें राजस्थान दणाणून टाका!

[गजसिंहाच्या पक्षाकडील लोक खेरीज करून वाद्याच्या गजरांत सर्व जातात.]

**गजसिंह**—पाहिलेंत! हे बेअक्कल राजे अखेर संगाच्या शब्दजालाला मोहून त्याच्या मागोमाग गेलेच! आरंभीं एवढा संकेत केला, परंतु संगानें दरबारांत पाय ठेवल्याबरोबर तुह्मीसुद्धां भेदरून गेलांत, आणि आपलें आसन सोडून उभे राहिलांत, तेव्हां मलाहि सर्वांसारखें होणें भाग पडलें! बाकी, माझ्या मुद्रेवरून व एकंदर हाल चालीवरून संगाची चांगलीच खात्री झाली असेल, कीं, हें पाणी कांहीं सामान्य नाहीं ह्मणून!

**विदूषक**—प्रत्यक्ष राणा संग समोर उभे असतां आमच्या महाराजांनीं त्यांच्याकडे नुसतें पाहिलेंहि नाहीं, मग यांच्या मुखांतून स्तुतिस्तोत्र ऐकायला मिळण्याइतकें त्यांच्या नशिबीं कुठचें! बस्स, एकसारखी पायांकडे तंद्री लावून दिली होती, व सर्वांगाचा भीतीनें—नव्हे—क्रोधानें थरकांप उडाला होता! संगानें आणखी दोन गोष्टी बोलण्याचें जर मनांत आणलें असतें तर आमचे महाराज त्याच्या पायांवर तुटून कोसळले असते, समजलांत!

**तुवर**—राणाजी! आपण इतके नाराज होऊं नका. माझ्यावर भरंवसा ठेवा. हें सर्व उलथून पाडण्याची मी कांहीं तरी युक्ति काढल्याशिवाय राहाणार नाहीं. निशाणाची युक्ति कशी छान साधली! तो करणसिंग कसा चिमखड्यासारखा उडाला आणि राणाहि किती नरम आला.

**गजसिंह**—तुमच्याबद्दल माझें कांहीं ह्मणणें नाहीं. माझ्याशीं—जुळतात अशीं फक्त तुमर्चीच मतें, व माझे खरे दोस्तहि तुह्मीच!

**विदूषक**—( बाजूस ) व गळफांस लावालहि तुह्मींच!

**गजसिंह**—बरें, मी आतां तुमची रजा घेतों.

[ जातो.

**जैतासिंग**—गड्या! आजचा रंग अगदींच बिघडला.

**तुवर**—मीं पूर्वीच तुह्माला सांगितलें होतें कीं नाहीं, कीं, संग्रामसिंह ह्या राजमंडळाच्या पोंचट गुरकावणीला कधींहि दाद देणार नाहीं ह्मणून? सोसाट्याचें वादळ सुरू झालें ह्मणजे रस्त्यावरचा केरकचरा जसा एका जागीं गोळा होतो, किंवा चोहोंकडे विखुरला जातो, तशी यांची स्थिति! जिकडे वाहवतील तिकडे वाहवतील!

**जैतासिंग**—असें तर खरें. परंतु त्याला उपाय काय?

**तुवर**—उपाय? दुसरा काय! वादळाचा बंदोबस्त झाला, ह्मणजे आटपलें.

**जैतासिंग**—तें कशाचें आटपतें! आतां तर त्याला दुप्पट जोर आला आहे!

**तुवर**—जोरबीर कांहीं नाहीं.राण्याला शत्रु फार झाले आहेत. मला धास्ती वाटते, कीं, एखादे वेळीं राण्याचा जीव धोक्यांत येईल व हा जोरबीर थंडा पडेल.

**जैतासिंग**—हें कांहीं निराळेंच गारूड दिसतें!

**तुवर**—मजजवळ एक नकल्या नोकर आहे—काय असेल तें असो, त्याचें डोकेंच अलीकडे फिरून गेलें आहे व तो रात्रंदिवस संगाच्या नांवानें खडे फोडित असतो. यामुळें कोणच्या वेळीं त्याच्या हातून काय होईल, याचा नेम नाहीं.

**जैतासिंग**—आतां पूर्ण उजेड पडला; पण संभाळा बुवा! ही आपली कल्पना अचाट व धाडसाची आहे; बाकी प्रसंगाला अनुरूप आहे. परंतु—

**तुवर**—परंतु ठेवा गुंडाळून! शहाण्या लोकांनां तुमचा तो 'परंतु' आडवा येत नाहीं! निश्चयाचें बळ पाहिजे! चला, नीट हुशार रहा व शपथेची आठवण ठेवा.

[ जातात.

---

## प्रवेश चवथा.

[ **स्थळ**—राणी कर्णावतीचा महाल. ]

**राणी**—( भिंतीवरील चित्रांकडे पहात. ) कायग रामप्यारी, हें रामपंचायतन तुला आवडतं ग?

**रामप्यारी**—हें काय बाईसाहेब! देवाचं चित्र, त्याला वाईट कोण ह्मणेल ?

**राणी**—तसं नव्हे ग ! माझं ह्मणणं-इतकंच, कीं, हें श्रीरामाचं चित्र बरोबर जसं असावं तसं आहे का ?

**रामप्यारी**—हो, अगदीं बरोबर आहे ! त्याचा तो सांवळा रंग, ती शांत मुद्रा, अन् तीं दिव्य किरीटकुंडलं वगैरे सर्व कांहीं असावं तसंच आहे. शिवाय, तें चित्र काढणारा चितारीहि फार नामांकित आहे—

**राणी**—तें नको मला सांगूस! माझं विचारणं इतकंच कीं, ह्या पंचायतनांतला हा श्रीराम व त्याच्या अंकावर बसलेली ही सीतादेवी, यांनां पाहून आपल्या मनाला काय वाटतं ?

**रामप्यारी**—दुसरं काय वाटणार ! माझ्या मतानं स्त्री अन् पुरुष यांमधील निष्कपट प्रेमाची हें चित्र एक साक्ष आहे !

**राणी**—काय असेल तें असो, तुझ्या ह्मणण्यांतला अर्धा भाग मला नाहीं पसंत! बिचारी सीतादेवी प्रेमाची मूर्तिमंत पुतळी दिसते, हें खरं, पण हा श्रीराम मात्र मोठा ढोंगी दिसतो! कारण, ह्यानंच लोकांच्या खोट्यानाट्या गोष्टींवर भरंवसा ठेवून त्या निष्कलंक देवीचा त्याग केला! चित्रांतलं हें सौम्य स्वरूप अन् तें राक्षसी कृत्य याचा जर मेळ बसत नाहीं, तर हें चित्र बरोबर कसं ह्मणायचं ?

**रामप्यारी**—बरं, तें राहिलं ! हें शिवपंचायतन तरी पहा. हा भोळा सांब प्रपंचसुखाचा कसा मोठ्या आनंदानं उपभोग घेत आहे !

**राणी**—हा सांब भोळा वाटतोना तुला ? तर मग हें चित्र अगदींच चुकलं ! द्यूत खेळतांना स्वतःच्या अंगावर डाव आला ह्मणून चिरडीस जाऊन ह्यानं त्या अंबेचा त्याग केला, ही गोष्ट त्या चिताऱ्याला माहीत नव्हती, असं दिसतं.(दुसरें चित्र पाहून) अग, ती पहा तीच जगन्माता! पतिविरहानं व्याकुल होऊन आपल्या कोमल पदांनीं कशी अरण्य तुडवित आहे! पंचायतनांतला तो भोळा सांब आतां कुठंग लपून राहिला? तूं ह्मणालीस, ती निष्कपट प्रेमाची साक्ष हीच का ? पुरुषांच्या ह्या कृतीला नांव तरी काय द्यावं बाई! चारचौघांत स्त्रियांबद्दल गोष्टी निघाल्या, कीं, जशी अगदीं साखर पेरायची! स्त्रिया ह्मणजे जगाचं भूषण! उत्तम गुणांची खाण! सुखाचं निधान ! अन् मोक्षाचं साधन ! काय एक नि दोन–वाटेल तेवढं स्तुतिस्तोत्र गायचं ! पण तें कुठपर्यंत ? घरीं तब्यत सांभाळण्यांत राणीसाहेब दक्ष आहेत तोंपर्यंतच !! जर का मर्जीविरुद्ध एवढीशी गोष्ट घडली, तर तो पहा तुझा भोळा सांब कसा उलटला–पाहिलास ! !

**रामप्यारी**—बाईसाहेब ! आपण असं ह्मणतां, तर हा पहा, हा इथं तोच श्रीराम आपल्या बायकोसाठीं अगदीं वेडा होऊन ह्या पंचवटींतील झाडाखालीं कसा शोक करित बसला आहे !

**राणी**—मग त्यांत आश्चर्य कसलं आणि यांत त्या रामाचा चांगुलपणा तो काय दाखवित्येस ? दुसऱ्याला ज्यानं विनाकाण रडवलं, त्यावर केव्हांना केव्हां स्वत: रडण्याची पाळी ही यायचीच ! (तिकडे न पाहतां) रड ह्मणावं बाबा–खुशाल मोठ्ठा गळा काढून रड ! मला नाहीं त्याची कींव यायची !

**रामप्यारी**—बरं, ही भिल्लिणीची तसबीर तर पहा! ही तरी आवडते का ?

**राणी**—(पाहून उत्सुकतेनें जवळ जाऊन) अग, नुसती आवडली एवढंच नाहीं, तर अगदीं मनापासून आवडली ! हें शंकरभिल्लिणीचं चित्र फार छान उतरलं आहे ! वाहवा–मौज पण मौज आहे! ! ह्या भिल्लिणीनं सगळ्या पुरुषवर्गाच्या डोळ्यांत अगदीं चरचरीत अंजन घातलं ! विचारी पार्वती आर्जव करतां करतां थकली, अन् इथं पहा हा शंकर ह्या भिल्लिणीभोंवतीं कसा बागडतो आहे ! घरच्या बायकोचा एक शब्द सहन झाला नाहीं–पण इथं पहावं तर हा लगट करतो आहे अन् ती झिडकारते आहे ! ! खरोरे खरा–भोळा शंकर ! फार–फार–फार भोळा ! ही भिल्लीण ह्मणजे प्रत्यक्ष पार्वतीच आहे असं जेंव्हां त्याला कळलं, तेंव्हांच्या त्याच्या फजितवाड्याचं चित्र मला याहूनहि शंभरपटीनं आवडलं असतं !! मात्र तें काढण्याला पुरुषवर्गांतला चितारी नाहीं हो उपयोगाचा !

**रामप्यारी**—पण बाईसाहेब, आज हें आपण चालवलं आहे तरी काय ?

**राणी**—अग, तें तुला नाहीं समजायचं! इतकंच नाहीं, तर चितोडच्या पट्टराणी शिवाय इतरांच्या ध्यानांत यांतील मर्म कधींहि यायचं नाहीं ! असं पहा, तो शंकर नुसत्या खेळण्यांतल्या थट्टेवरून भवानीवर कोपला, अन् यानं तिचा त्याग केला; त्यांतलीच गत माझी ! फक्त तिकडून त्याग करायचाच कायतो राहिला आहे ! मीं आमच्या वन्संची करणसिंगाच्या संबंधांत उगीच कुठं थट्टा केली, ह्मणून स्वारीचा मजवर केवढा राग झाला पण ! इतक्या काकुळतीस आल्यें, विनवण्या केल्या, रडल्येंहि–पण व्यर्थ ! ! ( उद्वेगानें सुसकारा टाकून ) एखाद्या गुन्हेगाराप्रमाणं मला समोरून हांकून देऊन त्या करणसिंगाला देहांत शिक्षा दिली ! !

**रामप्यारी**—( लांब पाहून ) पण बाईसाहेब ! मला वाटतं सरकारस्वारीच इकडे येत आहे—

**राणी**—खरं का, मग ती भिल्लिणीची तसबीर मला आणखी एकदा पाहून घेऊंद्या लवकर ! ( तसबीर पहात ) तूं मात्र सर्व व्यवस्था नीट ठेव बरं ! ( आरशाजवळ जाऊन पोषाखाची टापटीप पहात स्वगत ) आज दरबारांत स्वारींनीं मोठाच जय मिळविला आहे. पण इथं कांहीं ह्मणावं तितकं सुलभ काम नाहीं! येऊनजाऊन करणसिंगाच्या थट्टेबद्दलची धास्ती–पण पाहून घेईन! स्वारींची लष्करी-कामांत मोठी हुशारी असेल, पण आमच्यासारख्या शत्रूपुढं हारच खावी लागेल ! आरंभीं खूप अवसान आणायचं होईल हें मी जाणून आहें; पण तें कुठपर्यंत ? आमचं बायकांचं हत्यार मीं उपसलं नाहीं तोंपर्यंतच ! ह्या भिल्लिणीचे आज मजवर मोठे उपकार झाले आहेत ! पण आली वाटतं स्वारी ! ( एका बाजूला रागाचा आवेश दाखवून उभी राहते. )

**संग्रामसिंह**—(प्रवेश करून स्वगत) आजचा प्रकार कांहीं निराळाच दिसतो ! ( जवळ जाऊन ) तब्यत तर ठीक आहेना ? ( कर्णावती बोलत नाहीं. ) बंडखोरांच्या टोळ्यांशीं मला आजपर्यंत पुष्कळ प्रसंग पडले, परंतु मला पाहिल्याबरोबर ते सारे एकदम शरण येत. इथेंहि असाच प्रकार होईलसें वाटलें होतें–परंतु प्रत्यक्ष अनुभव अगदींच निराळा ठरतो ! इथें तर मला पाहून ह्या बंडखोरांना जास्तच अवसान आलें आहे, व अगदीं दंड ठोकून संग्रामाला सिद्ध झालेले दिसतात ! असो. ज्या अर्थीं आज राजमंडळाशीं समेट झाला, त्या अर्थीं हा घरगुती असंतोषहि नाहींसा केला पाहिजे. ( उघड ) कसें काय ! इतका राग ? आमच्याकडे नुसतें पहाणेंहि होत नाहीं ? आजच्या घटकेला सर्व दुनियाच आमच्यावर उलटल्यासारखी दिसते !

**कर्णावती**—ह्मटलं, इतक्या कोमल भाषणाला ही कर्णावती पात्र नाहीं !

**संग्रामसिंह**—असें असें ! हें उसनें फेडून घेणें चाललें आहे वाटतें ?

**कर्णावती**—उसनं कशाला ! आह्मां स्त्रियांचा जन्मच बोलून घेण्याचा आहे ! ती स्त्री प्रत्यक्ष मेवाडची पट्टराणी असली ह्मणून काय चिंता आहे ! मातोश्री पार्वतीवर-सुद्धां नुसत्या खेळण्यांतल्या थट्टेवरूनच ना ईश्वर कोपला ? देवादिकांच्या घरच्या ह्या गोष्टी, मग मी तर बोलूनचालून मनुष्यच !

**संग्रामसिंह**—अलीकडे पहावें तों वेदांत फार सवंग झाला आहे ! आणि मजा ही कीं, आह्माला त्यांत कांहीं कळत नाहीं ! याला उपाय हाच कीं, आपण आपलें अज्ञान उघडपणें कबूल करायचें व सर्व राजस्थान ज्याला जहाल समजतें तो यापुढें महासागरासारखा शांत आहे असें दाखवावयाचें. बोला, आपण वाटेल तें बोला, आह्मी सर्वस्वी अपराधी आहों !

**कर्णावती**—इतकं नको कांहीं टोंचून बोलायला—मला हें सगळं समजतं बरं! आतां कशी साखर पेरणं चाललं आहे! नाहीं तर त्या दिवशींची गोष्ट! एवढी तरी कींव आली का? त्या मेल्या मानकाप्या मांगांदेखत माझी अवहेलना करतांना जिवाला कांहीं तरी वाटलं का?

**संग्रामसिंह**—आपला राग जर असळ कमी करशील तर तुझी समजूत घालतां येईल. असळ अशी बैस तर खरी! (राणीला बसवितो व स्वत: बसतो.) त्या करणसिंगाचा सर्व वृत्तांत मला कळला; पण खरेंच सांगतों, त्यांत तुझ्याकडे फार दोष येतो. एकंदर प्रकार आपल्या मोठेपणाला न शोभणारा झाला. कां बरें तूं त्याची थट्टा केलीस? तुझ्या त्या भलत्याच थट्टेचा परिणाम किती वाईट झाला बरें! आतां तुला कदाचित् त्याचें तेवढें महत्त्व वाटणार नाहीं; परंतु तेवढ्यावरूनहि प्रसंगीं मोठमोठ्या राष्ट्रांत बेबनाव होऊन रक्तपाताला कारण होतें.

**कर्णावती**—असं झालं तरी काय पण! उगाच घटकाभर मौज केली. वास्तविक कांहीं चूक असेल तर ती त्या वेताळ्याची! त्यानं त्याला अगदीं माझ्या महाला-जवळ आणलंन् अन् तितक्यांत नेलं कुणीं निशाण चोरून. पण एवढ्याकरितां इकडून त्या सरदाराचा प्राण घेण्याचा हुकूम केला. इकडच्या मीं किती विनवण्या केल्या, पण दया आली का? बायकांच्या शब्दाला मान देतो कोण!

**संग्रामसिंह**—अझून तेंच! कमाल आहे बुवा तुझ्या हेकेखोरपणाची!

**कर्णावती**—खरंच तें! आह्मी जर तशा शहाण्या असतों, तर आमच्या शब्दाचं वजनहि पडतं, अन् त्या बिचाऱ्याचा प्राणहि वांचता! मरतांना त्यानं मला नाहीं नाहीं ते शाप दिले असतील—अन् कदाचित समंध होऊन माझ्यामागं लागला तर (रडत) माझी काय दशा होईल! नकोग बाई हा बायकांचा जन्म!

**संग्रामसिंह**—हें काय चालविलें आहेस भलतेंच? झालें तें झालें. आतां काय त्याचें. त्या करणसिंगाला मीं सोडून दिला. त्या यवन हकिमाचे मागणीवरून त्याला त्याच्या हवालीं केला.

**कर्णावती**—(दूर होऊन) काय! त्याला यवनाचे ताब्यांत दिला? मी प्रत्यक्ष मेवाडची राणी असून माझ्या विनंतीला मान न देतां त्या यवनाची मागणी कबूल केली? अन् करणसिंगाला त्याची गुलामगिरी करायला लाविली? असल्या लांछनास्पद जिण्यापेक्षां माझ्या कुडींतून हा प्राण एकदम निघून गेलेला काय वाईट!

**संग्रामसिंह**—( रागानें ) त्या हकिमानें माझे प्राण वांचविले, हें तुला माहीत नाहीं का ? माझ्या प्राणाची जर तुला कांहीं पर्वा असेल, तर त्याला जी मीं देणगी दिली त्याबद्दल तुला वाईट वाटूं नये.

**कर्णावती**—( स्वगत ) बोलण्याचा झोंक पुन्हा बदलला. आतां थोडं पडतं घ्यावं. (उघड) खरंच का, तोच का तो हकीम ? मग नाहीं बाई माझं कांहीं ह्मणणं ! (जवळ जाऊन) पण गडे, माझ्याकडे कां बरं नाहीं त्याला घेऊन येणं झालं ? अशा सत्पुरुषाचा सत्कार मेवाडची राणी कसा करिते, हें तरी सगळ्या जगाला दिसलं असतं !

**संग्रामसिंह**—बरें, तसाहि योग जमणें कांहीं अवघड नाहीं, आतां तरी राग शांत झाला का ? त्या तुझ्या वेताळ्याला त्याच्या बायकोसुद्धां सरकारी नजराण्याबरोबर शहाकडे रवाना केलें आहे.

**कर्णावती**—फार चांगलं झालं ! मेलीं मोठ्ठीं खोडकर ! पण गमतीहि तशींच.

**संग्रामसिंह**—जाऊंद्या, गमतीला काय कमी आहे. ( स्वगत ) एकीकडलें वादळ शांत झालें; पण झंझावात अझून पुढेंच आहे ! (उघड) कां, आमच्या ताईसाहेब कितपत गरम झाल्या आहेत !

**कर्णावती**—वन्सं ? अग बाई ! त्यांच्या रागाच्या पासंगासुद्धां आमचा राग शोभणार नाहीं ! त्यांनीं तर आह्मां सर्वांशीं भाषणच वर्ज केलं आहे. पण खरंच गडे, त्यांच्यावर असं कां रागवायचं ? अशा बहिणी तरी किती आहेत इकडे ?

**संग्रामसिंह**—त्याचा विचार मग करूं. अगोदर तुझ्या एका दासीला पाठवून तिला इथें बोलावून आण. ( दासी जाते. ) आज सर्वांशीं संधि करून टाकायचा, असा निश्चयच केला आहे. ह्या किरकोळ भानगडी फार वाढल्या; ह्यांचें निराकरण झालें, ह्मणजे मोहिमेच्या कामांत हरकत येणार नाहीं. (कमलावती येऊन राणीजवळ उभी रहाते. ) कसें काय ताईसाहेब, तव्यत ठीक आहे ना ?

**कमलावती**—ठीक नसायला काय झालं !

**संग्रामसिंह**—काय झालें तें आह्मी जाणतों ह्मणा, परंतु आमचा तरी तेथें नाईलाज आहे. एकंदर प्रकारांत आमचाहि थोडासा गैरसमज झाला होता, हें आह्मीं पहिल्यानेंच कबूल करितों. अस्पष्ट सृष्टींतून प्रवास करतांना पुष्कळ वेळां नुसती छाया प्रत्यक्ष वस्तूचा भास उत्पन्न करिते. तेव्हां आमच्या अविचारानें झालेल्या चुकीबद्दल तुह्मीं आह्माला माफी करूं नये का ?

**कमलावती**—भावानं जरी अविचार केला तरी त्याचं कांहीं वाटत नसतं; परंतु तोच भाऊ जर महाराणा या नात्यानं अन्याय करील, तर बहिणीला तो कसा गोड लागेल ?

**संग्रामसिंह**—छे छे, ताईसाहेब ! हें भाषण इथें शोभत नाहीं. ही म्लान मुद्रा व हीं शुभ्र वस्त्रें पाहून एखाद्याला वाटेल, कीं, आपणावर दुःखाचे डोंगर कोसळले आहेत; अथवा, एखाद्या सुंदर तरुणाशीं आपला विवाह ठरला असून तो एकाएकीं अदृश्य झाल्यामुळें आपण फार शोकाकुल झालां आहां. या हें सर्व सोडून अन् आनंदी व्हा. ज्या कारणाकरतां दुःख करितां, तें तर मुळींच झालें नाहीं, मग हा शुभ्र पोशाख कशाला आणि दुःख तरी कशाचें ?

**कमलावती**—सिसोदिया वंशाची आजपर्यंतची निर्मल कीर्ति लयाला गेली व माझ्या पित्याच्या नांवाला बट्टा लागला, ह्मणून !

**संग्रामसिंह**—(संतापून) काय ह्मणतेस ? सिसोदिया वंशाची कीर्ति लयाला गेली अन् पित्याच्या नांवाला बट्टा लागला—आणि तो अर्थात् माझ्या कृतीनें ? बोल, तुला मोकळीक आहे. तुझ्याशीं बोलतांना शांततेचा अंगिकार केला पाहिजे. क्रोधाच्या भरांत जास्त अन्याय केल्याचा आरोप येईल. बोल, बट्टा लागण्यासारखें मीं काय केलें ?

**कमलावती**—महाराणाजी, ऐकावं ! सिसोदिया वंशांत आजपर्यंत अपराध्याला कायदेशीर शिक्षा अगर माफी मिळत असे; परंतु लष्करी गुन्हा करणाऱ्या एखाद्या अस्सल व शूर रजपूत सरदाराला विधर्मी यवनांच्या गुलामगिरींत देऊन भ्रष्ट करविलं असं कधींहि घडलं नव्हतं ! खऱ्या रजपूताचं स्वातंत्र्य नष्ट होण्यापेक्षां जीवित नष्ट होणं जास्त हितावह होईल ! त्या दुर्भाग्याला देहांताची शिक्षा दिली असती, तर लोक फार तर इतकंच ह्मणते, कीं, ‘ शिक्षा फार कडक झाली. ’ पण असं करण्यांत न्यायाची तरी बतावणी केल्यासारखं झालं असतं ! परंतु आपलं हल्लींचं कृत्य घोर जुलमाचं द्योतक आहे !

**संग्रामसिंह**—ठीक आहे ताईसाहेब ! आपण इतक्या कष्टी होऊं नका. आपली इच्छाच असेल, तर आतांच स्वारांची एक तुकडी पाठवून त्याला परत आणवितों. तुमच्या प्रियकराची हद्दपारीपेक्षां देहांतानेंच जर कांहीं विशेष सोय होण्यासारखी असेल, तर आह्मी आड येणार नाहीं !

**कमलावती**—बस्स करा, ही आपली जीव घेणारी थट्टा ! ह्या असल्या थट्टांनींच तुह्मीं ह्या मोहिमेचा एक प्रबल अवयव आपल्या हातानें नाहींसा केला !

व स्वतःसारख्या संशयी स्वभावाच्या इतर लोकांनां ह्मणावयाला जागा केलीत, कीं, ' करणसिंगासारखा अति शूर सरदार एखादे दिवशीं पराक्रमांत आपली बरोबरी करील असा मत्सर महाराणाजींच्या मनांत उत्पन्न होऊन त्यांनीं ह्या रजपूत वीराला दूर केलं ! '

**संग्रामसिंह**—मत्सर आणि ह्या संग्रामसिंहाच्या मनांत ? तो जर या क्षणीं इथें असता तर फार बरें होतें ! मी आपला मानमरातब एकीकडे ठेवून त्याच्या बरोबर सामन्याला उभा राहिलों असतों व मला चीत करण्याची ताकद ज्याच्या अंगीं आहे असा मायचा पूत तो नाहीं, हें तुझ्यासमक्ष त्याच्या तोंडून वदविलें असतें! ताईसाहेब ! आपण जें बोलतां त्याला तुमचें मन खात्रीनें साक्ष देत नसेल. मग तुमचा प्रियकर दूर गेला, ह्मणून त्याच्या विरहानें दुःखी होऊन असें बोलत असाल तर नकळे !

**कर्णावती**—वन्सं, तुह्मी तरी उग्या रहा गडे ! आहे काय हें ?

**कमलावती**—वहिनी ! तूं एक शब्दहि मधें बोलूं नकोस ! नाहीं तर आणखी एखादा निराळाच तंटा उपस्थित होईल. ( पुढें होऊन ) काय ह्मटलंत दादासाहेब ! माझा प्रियकर आणि विरहानं दुःखी ! हे शब्द आपल्या मुखांतून दोन वेळ ऐकले. ठीक आहे, तसंच कां होईना–ती संज्ञा मिळवायला त्याला कष्टहि कमी पडले नाहींत व त्याबद्दल मलाहि मुळींच शरम वाटणार नाहीं ! तो माझा प्रियकर झाला असं ह्मणण्यांत मीं आपली योग्यता कमी करून घेतली, अगर तोहि मर्यादेबाहेर वागला, असं प्रत्यक्ष आपल्याच्यानं ह्मणवणार नाहीं !

**संग्रामसिंह**—ताईसाहेब, आपलें डोकें आज ठिकाणावर नसल्यामुळें जास्त वाद करण्यांत हांशील नाहीं. वडीलपणाच्या नात्यानें आह्माला जें तुमच्या हिताचें व वाजवी वाटलें, तें बोललों; परंतु ज्या अर्थी स्वतःच्या शहाणपणावरच तुमचा भरंवसा जास्त आहे, त्या अर्थी आह्मीं पडतें घ्यावें हेंच रास्त आहे ! असो. बोलल्या चालल्याचा राग मनांत न ठेवतां पूर्ववत् आमच्यावर प्रेम ठेवित जा, एवढीच विनंति आहे. यापुढें तुमच्या इच्छेविरुद्ध आह्मी जाणार नाहीं.

[ जातात.

[ पडदा पडतो. ]

# अंक पांचवा.

## प्रवेश पहिला.

[**स्थळ**--राणा संग्रामसिंहाचें शिबिर. राणा व जवानसिंग बोलत बसले आहेत, असा प्रवेश.]

**संग्रामसिंह**--( पत्रव्यवहार पहात ) जवानसिंग! हा खलिता आणणारा इसम कुठें आहे?

**जवानसिंग**—सरकार, हा इसम मोठा भयंकर प्राणी दिसतो! जातीचा बहुधा शिद्दी असावा. बाबरशहाचा खलिता असल्या भेसूर प्राण्याच्या हातीं यावा, यांत त्या इसमाच्या तोंडासारखेंच कांहींतरी काळेंबेरें असलें पाहिजे!

**संग्रामसिंह**--व्यर्थ वटवट करूं नकोस! जा, त्याला आमच्यासमोर बोलाव. ( जवानसिंग जातो. ) काय ह्मणतो बादशहा? वाचूं तर खरें. ' बहुत बहुत सलाम. परवर दिगारच्या कृपेनें आपणास आराम पडून आपली प्रकृति पूर्ववत् झाली, हें पाहून आह्माला परमानंद झाला. आपल्या खलित्यासमेत आलेला फर्माशी नजराणा पाहून आह्मी फार खूष झालों. बेताळ्या व सटवाई हा जोडा अमोलिक आहे व त्यायोगें आमची फार फार करमणूक होईल. ह्या आपल्या कृपेचें कांहीं अशीं उतराई व्हावें, ह्मणून आह्मीं खास आपल्या सेवेसाठीं ' जोहार ' नांवाचा एक शिद्दी पाठविला आहे. त्याच्या रंगरूपावर आपण नजर पोहोंचवूं नका. त्याचे अंतर्गत गुण बिनमोल आहेत. हा शरीरानें मजबूत व धन्याचा हुकूम बजावण्यांत फार तत्पर आहे. शिद्दी जातीचे लोक मोठे जादुगार असतात, हें आपण जाणत असालच; त्यांतलाच हाहि एक आहे. याची वाचाशक्ति नाहींशी झाली आहे, परंतु अल्प सहवासानेंहि याच्या खाणाखुणा आपण समजूं लागाल. शिवाय, तुमच्या चालीरीति व भाषालेखन हेंहि याला अवगत आहे. एकंदरींत, याच्या गुणांचें आपल्यापाशीं योग्य चीज होईल, अशी आह्माला बळकट उमेद आहे. आपली प्रकृति उत्तरोत्तर सुधरत जाऊन तुमची आमची भेट पूर्ववत् समरांगणावर लवकर होवो, ही अल्लातअल्लाजवळ प्रार्थना करून हें पत्र पुरें करितों.' ( जवानसिंग, सिद्याचा वेष घेतलेला करणसिंग, व शेऱ्या कुत्रा, येतात. मुजरा होतो.) हाच तो सिद्दी! याच्या शरीराचा बांधा, अवयवांची ठेवण, मर्दानी ऐट व मर्यादशील नजर, ह्या गोष्टींनीं हा आमच्या नोकरीला अगदीं लायक दिसतो.

हा मुका आहे, नाहीं का—अर्थात्, बहिराहि असेल. (त्याला उद्देशून) कायरे, तुला बोलतां नाहीं का येत?

**सिद्दी**—( मान हालवून एक बोट आकाशाकडे दाखवून नंतर तेंच ओंठावर ठेवितो. )

**संग्रामसिंह**—समजलों. तूं जन्माचा मुका नसून कांहीं ईश्वरीक्षोभानें असा झालास. बरें, तुला ऐकायला येतें ?

**सिद्दी**—( होय, असें मानेनें सुचवितो. )

**जवानसिंग**—( बाजूला ) ही एक पिडाच दिसते!

**संग्रामसिंह**—(स्वगत) तूर्त याला काय बरें काम सांगावें? माझ्या आजारीपणामुळें या तलवारीवर अम्मळ गंज चढल्यासारखा दिसतो. (उघड) का रे, तुला ढाल तरवार, चिलखत वगैरे साफ करतां येतें ?

**सिद्दी**—( होय, असें सुचवितो. )

**संग्रामसिंह**—घे तर तीं. पाहूं तुझी करामत. ( शिद्दी तीं घेऊन बाजूस जाऊन साफ करित बसतो.) आमच्या नोकरीला हा अगदीं लायक आहे. बोलतां येत नाहीं, ही त्यांतल्या त्यांत समाधानाचीच गोष्ट झटली पाहिजे. फाजील भाषण व चहाडखोरपणा ह्या दोहोंचा पक्का बंदोबस्त झाला! (ऐकलेंसें करून) बाहेर गडबड कसली दिसते ! (उठून पुढें होऊन पहातो ) अरे, कोणी इसम अलगूज वाजवित आहे. जवानसिंग ! जा, बोलाव त्याला. आपणहि थोडी करमणूक करून घेऊं.

( जवानसिंग त्याला आणितो. अलगूजवाला मुजरा करून वाजविण्यास सुरुवात करतो. )

**अलगूजवाला**—( वाजवित असतां स्वगत ) राजा तुवर व जैतसिंग यांचें काम माझ्या हातून सिद्धीस जाणार व पांचशें मोहोराहि आपल्याला मिळणार, असें वाटूं लागलें आहे.

**करणसिंग**—(स्वगत) ह्या इसमाची चर्या नीट दिसत नाहीं. आपण अम्मळ हुशार रहावें.

**संग्रामसिंह**—(अलगूजवाल्यास) फार चांगलें काम केलेंस, हें घे तुला इनाम.

( एक शेला देतो. तो घेण्यास अलगूजवाला पुढें होतो व एकदम राण्यावर कट्यार फेंकण्याचा प्रयत्न करितो. परंतु करणसिंग त्याचें मनगट एकदम पकडून त्याला लोळवितो. दोघांची झटापट होते. अलगूजवाला बेशुद्ध पडतो व करणसिंगाच्या हाताला जखम होते. )

**संग्रामसिंह**—शाबास जोहार! बहाद्दरी केलीस!

**जवानसिंग**—दगा, दगा! धावा धावा!

**संग्रामसिंह**—चूप बैस जवानसिंग! गोंधळ करूं नकोस! ह्या दग्याचे धागे दूरवर आहेत. तूर्त ह्या इसमाला इथून उचल व त्या पलीकडच्या खोलींत ठेव. त्याच्या जखमांवर मलमपट्टी वगैरे लावण्याची तजवीज कर, अन् हा शुद्धीवर आल्याबरोबर मला वर्दी दे. जा, आतां तरी नीट हुषार रहा. (शिद्याकडे पहातो) वारे बहादर! अरे, पण हें काय? ह्याला जखम झाली वाटतें! (जवानसिंगास) जवानसिंग! चोखून घे, ही जखम विषारी पात्याची दिसते! पण कांहीं जबर नाहीं. चल, विचार कसला करतोस? अरे, रक्त ओढून घे अन् थुंकून टाक. मरणाची धास्ती वाटते होय?

**जवानसिंग**—तसें नाहीं! पण मी ह्मणतों, ह्या काळ्या भूताच्या जिवासाठीं इतकी दगदग करण्याची कांहीं मोठीशी जरूर नाहीं.

**संग्रामसिंह**—(त्वेषानें) जा, बैस तिथेंच! त्याच्या जिवाची पर्वा तुला नसली, तरी मला आहे! (जखम स्वतः चोखूं लागतो. शिद्दी आढेवेढे घेतो.)

**जवानसिंग**—सरकार, हें काय! मी आपल्या हुकमाबाहेर आहे कीं काय?

**संग्रामसिंह**—चल हो दूर! (तोंड धुतो व शिद्याचा हात ओल्या रुमालानें पुसतो. इतक्यांत आश्चर्यचकित होऊन स्वगत) हा काय प्रकार आहे! जखम धुतल्यानें ह्याचा हात पांढरा कसा झाला? अरे, हा रूमालहि काळा झाला! (न्याहाळतो. सिद्दी खालीं तोंड करून उभा रहातो.) चेहऱ्याची ठेवण तशीच! अवयवांतहि फरक नाहीं! शौर्यहि तसेंच! मुक्याचें सोंगहि ठीकच आहे! ह्याची ही दशा पाहून मला फार वाईट वाटतें. असो. तूर्त हें असेंच चालू द्यावें. ह्याचा उलगडा प्रसंगानें होण्यांतच मजा आहे. बाबरशहा मोठा धूर्त खरा! ह्याचा तो इमानदार कुत्राहि हाच असावासें वाटतें. (कांहीं वेळ विचार केलासें दाखवून) असेंच करावें! हा जादुगार काय करामत करणार, ही ध्यानांत आली! (एकदम जागेवर जाऊन) जवानसिंग! (मेजावरचा एक पत्रव्यवहार हातांत घेऊन) राजमंडळाकडून आज जो खलिता आला त्यांत असा मजकूर आहे, कीं, 'आपलें निशाण चोरीला गेल्यानें झालेला अपमान भरून काढण्यासाठीं व सर्व सैन्यास आपलें दर्शन व्हावें यासाठीं उद्यां एक भव्य निशाण आपल्यासाठीं मुद्दाम तयार करून तें बजरंग टेंकडीवर उभारण्यांत येईल व त्यापुढें सैन्यांतील सर्व अधिकारी आपापल्या लव्याजम्यानिशीं सन्मानपूर्वक सलामी देतील.' यासाठीं तूं असें कर, कीं, ह्या शिद्याला त्याच्या कुत्र्यासह तेथें जवळच एका बाजूला उभा कर, समजलास?

**जवानसिंग**—तेथें ह्या शिद्याची काय जरूर ?

**संग्रामसिंह**—तूं स्वतःला समजतोस मोठा शहाणा, पण वास्तविक आहेस अगदीं मूर्ख ! जा, फाजील पंचाईत करूं नकोस ! ( शिद्दी एक कागद घेऊन त्यावर कांहीं लिहितो.) अरे हा काय लिहितो आहे ? (शिद्यानें पुढें केलेला कागद वाचतो) 'हुजूरचा आशय मी समजलों. मी हीच संधि पहात होतों. मध्यंतरीं राजकुमारी कमलावतीबाईसाहेबांकडे बाबरशहाचा कांहीं निरोप पोंचविण्याची दासास परवानगी द्यावी.' असें ! अस्सें ! ही मोठीच गम्मत होणार तर !! ताई याला खात्रीनें ओळखील ! होऊं द्या काय होईल तें. आपण तरी विशेष ओढून धरण्यांत अर्थ नाहीं. ( उघड ) हें पहा, तुझी उद्यांची कामगिरी कशी काय वठते हें पाहून नंतर ह्या विनंतीचा विचार केला जाईल. तुझ्या जादूविद्येवर माझी सर्व मदार आहे, यासाठीं ती चांगली पाजळून ठेव.

[ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ **स्थळ**—छावणींतील एक रस्ता. ]

**विदूषक**—( ओरडत ) अरे बापरे ! ! मेलों–मेलों–मेलों ! नरडेंच धरलें ! केवढी ही जखम ! आणि काय हा रक्ताचा पूर ! ! ! अरे, तो पहा–तो काळराक्षस त्याचा सैतान्या कुत्रा ! अरे बापरे ! ! ! छातीनें ठाव सोडला ! चालला प्राण ! अहो कोणी धावा हो ! मेलों–मेलों–मेलों ! ( जमीनीवर गडबडा लोळतो. )

**गप्पीदास**—(धावत येऊन) अरे ओरडतें कोण ? अरे हा तर आमचा व्यवसाय बंधू ! (विदूषक पहिल्याप्रमाणेंच आणखी ओरडतो.) अरे, असें झालें तरी काय ? मेलास कशानें ? तुला काय धाड झाली आहे आणि लोळतोस काय असा हल्यासारखा?

**विदूषक**—अरे, तूं तरी सोडव रे मला ह्या यमाजी भास्करापासून ! यानें नड्यांचा डांस घेतला रे ! अरे, ह्या पहा रक्ताच्या नद्या वहाताहेत !

**गप्पीदास**—तुझें नरडें तर जसेंच्या तसेंच आहे. ते आवळलें असतें, तर हा भसाडा सूर कसा निघता त्यांतून ?

**विदूषक**—अरे, रक्ताच्या नद्या वहाताहेत त्या दिसत नाहींत का तुला ?

**गप्पीदास**—अरे, नुसत्या नद्याच कां ! त्यांच्या संयोगानें बनलेल्या महासागराचा कुठें पत्ता लागण्यासारखा असल्यास मला सांग. तोहि मी पाहून येतों. भल्या माणसा ! ऊठ आतां, ह्या तुझ्या बतावणीचा अर्थ तर सांगशील ?

**विदूषक**—( उठून ) अरे, अर्थ कसला घेऊन बसलास बाबा ? अनर्थ झाला, अनर्थ !

**गप्पीदास**—पुन्हा तेंच ! काय झालें तें सांग तर खरें !

**विदूषक**—काय झालें ? शिकार झाली-शिकार !

**गप्पीदास**—ह्मणजे ?

**विदूषक**—ह्मणजे एका कुत्र्यानें एका सावजाला पकडलें, नि हूं काय ?

**गप्पीदास**—मग त्यांत अनर्थ तो काय ?

**विदूषक**—अरे नडें धरलें रे बाबा !

**गप्पीदास**—सावजाचेंच ना ? तुझें तर बचावलें ?

**विदूषक**—माझें ? अरे बापरे ! तें कदाचित धरलें जाईल, ह्मणून तर पळून इथें आलों ! अन् मूर्खाचा धंदा करण्याला लागणारें खरें शहाणपण जर तुझ्या अंगीं असेल-तर तूंहि आपला आलास तसा परत जा !

**गप्पीदास**—हें पहा, तूं आतां नीट सगळा उलगडा कर. ही थट्टा पुरे झाली!

**विदूषक**—सांगूंच तर ? पण तो यमाजी भास्कर तर जवळपास नाहींना ?

**गप्पीदास**—( त्याच्यावर डोळे वटारतो )

**विदूषक**—असा रागावूं नकोस ! सांगतों सारें. हें पहा, आतां थोड्या वेळापूर्वीं सर्व सैन्याची महाराणा संग्रामसिंहाच्या निशाणापुढें सलामी झाली.

**गप्पीदास**—झालीसुद्धां का ? मी तीच पहाण्याला चाललों होतों.

**विदूषक**—वा:, आपला वक्तशीरपणा किती ह्मणून वर्णावा ?असो. निरनिराळ्या सैनिकांची सलामी होतां होतां त्या राजा सिलैदी तुवरची पाळी आली. स्वारीचा थाट तर काय अगदीं कडेकोट होता ! परंतु ते निशाणासमोर आल्याबरोबर निशाणामागून एक प्रचंड शिकारी कुत्रा चवताळून आला व त्यानें एकदम राजा तुवराचे नरड्यावर झडप घातली ! हां हां ह्मणतां तुवरराय घोड्यावरून अलग होऊन खालीं धुळींत गडबडा लोळूं लागले ! तो कुत्रा कांहीं तुवरराजांनां सोडीना. तेव्हां चटकन् त्या कुत्र्याचा धनी एक काळा सिद्दी एकदम पुढें आला व मोठ्या प्रयासानें त्यानें कुत्र्याला आवरलें. झालें. एवढ्यानेंच आमची स्वारी घाबरली अन् मारला सूंबाल्या !

**गप्पीदास**—एकून, त्या तुवरची नक्कल आपण करित होतां तर ? पण ह्यांतलें इंगित अझून राहिलेंच !

**विदूषक**—तें समजायला दूर नको जायला! हीं पहा तीं सर्व धेंडें इकडेच येत आहेत. चला, आपण आपल्या गजसिंह महाराजांची पाठ सांभाळूं.

(संग्रामसिंह, मेघसिंह, गजसिंह तुवर, जैतासिंग, शिद्दी, वगैरे येतात.)

**मेघसिंह**—ही मोठी चमत्कारिक गोष्ट झाली! माझ्या मतें यांत कोठें तरी जबर गैरसमज झाला आहे.

**पुरोहित**—मला वाटतें, यांत कांहीं तरी शत्रूचें कपट आहे!

**गजसिंह**—हा तर कुत्र्याच्या आणि ससाच्या शिकारीचाच प्रकार झाला! आह्मां स्वतंत्र राजांनां महाराणाजींनीं आपल्या शिकारखान्यांतलीं सावजेंच बनविलीं, ह्मणायचें!

**जैतसिंग**—हें सर्व यवनाचें कारस्थान आहे! ह्या जादुगार शिद्याला अन् त्याच्या कुत्र्याला एकदम कत्तल केलें पाहिजे! (शिद्याकडे अवसानयुक्त पहातो.)

**संग्रामसिंह**—संभाळा! या उभयतांपैकीं कोणाच्याहि अंगांतील रक्ताचा एक थेंब खालीं पडला, तर तो जिरूं देण्यापूर्वीं तुमचें डोकें उडवीन—याद राखा! तुवर! चल ये असा समोर, आणि या मुक्या जनावराच्या उपजत बुद्धीनें तुझ्यावर जो आरोप आणला आहे, तो नाशाबीत कर!

**तुवर**—मीं आपल्या निशाणाला हात लावला नाहीं!

**संग्रामसिंह**—पहा, तुझे शब्दच तुला घातुक होत आहेत! निशाणाबद्दल मीं अद्याप कोणाजवळहि वाच्यता केली नाहीं! इतका वेळ माझें ह्मणणें एवढेंच होतें, कीं, तुझ्या हातून या जनावराला केव्हां तरी इजा झाली व त्याबद्दल त्यानें या वेळीं सूड उगविला; परंतु आतां निशाणाच्या चोरीचाहि मी तुझ्यावर आरोप करितों.

**तुवर**—यांपैकीं एकहि गोष्ट मला कबूल नाहीं!

**मेघसिंह**—महाराणाजी! हा आरोप अलौकिक आहे. प्रत्यक्ष आपण कांहींच पाहिलेलें नाहीं. केवळ एका क्षुद्र जनावरावर भिस्त ठेवून राव सिलौदि तुवरांसारख्या शूर व अब्रूदार मानकऱ्यावर असल्या अनन्वित कृत्याचा आरोप करणें, बरेंच धाडसाचें दिसतें!

**गजसिंह**—राजा सिलौदि तुवर आणि ते असलें नीच काम करतील, अशी शंका मनांत आणणें देखील असंभाव्य वाटतें!

**संग्रामसिंह**—मेघसिंहजी! आपण असा कां नाहीं विचार करीत, कीं, त्या कुत्र्यानें तुवराच्या अंगावरच कां जावें? पहा, अद्यापहि त्याचा रोंख त्याकडेच दिसतो. इतकेंच नाहीं, तर ह्या तुवराला वाटेल त्या प्रकारचें बेमालुम रूपांतर द्या,

हा कुत्रा तशा स्थितींतहि ह्याला नेमका हुडकून काढील, हें मी खात्रीपूर्वक सांगतों. ह्या जनावराचा हा धर्मच आहे, कीं, आपल्या मित्राला तसेंच आपल्या शत्रूला तें कधींहि विसरणार नाहीं! फार लांब कशाला, खुद्द तुमच्या राज्यांत कांहीं वर्षांमागें अशाच प्रकारानें एक गुन्हेगार पकडण्यांत आला, व तो कबूल होईना ह्मणून त्या कुत्र्याशींच त्याचें द्वंद्व लावण्यांत आलें, असें माझ्या ऐकण्यांत आहे.

**मेघसिंह**—गोष्ट खरी; पण तो गुन्हेगार हलक्या प्रतीचा मनुष्य होता. ती न्यायपद्धती ह्यावेळीं लागू करणें वाजवी नाहीं.

**संग्रामसिंह**—आमचीहि पण तशी इच्छा नाहीं. ह्या कपटी तुवराशीं लढायला बिचाऱ्या मुक्या जनावराचा प्राण मी कां धोक्यांत घालीन? प्रत्यक्ष मीच त्याच्याशीं द्वंद्व करितों. तुवराच्या दर्जाशीं कुत्रा हलका ठरेल–पण मी तर हलका नाहींना?

**तुवर**—( स्वगत ) हें काम कठीण!

**मेघसिंह**—छे छे, ही जोडहि ठीक नाहीं. कुत्रा जितका नीच तितके आपण श्रेष्ठ आहां.

**जैतसिंग**—शिवाय, महाराणाजी हे चालू मोहिमेचे नायक आहेत, तेव्हां त्यांनीं स्वतः द्वंद्वाला प्रवृत्त होऊं नये.

**तुवर**—आणि मी प्रत्यक्ष राणाजींशीं द्वंद्व करणार नाहीं! यःकश्चित् कुतऱ्याच्या अकलेवर भरंवसा ठेवून ते जरी माझ्याशीं लढण्याला तयार झाले, तरी मीं त्या गोष्टीला अनुमोदन द्यावें हें एकंदरीनें उचित नाहीं. त्यांची मर्जी असल्यास आपल्या तर्फे कोणीहि योद्धा पुढें आणल्यास त्याच्याशीं लढण्याला मी तयार आहें.

**पुरोहित**—राव तुवरचें भाषण फार पसंत व नेमस्त विचाराचें दिसतें.

**मेघसिंह**—मलाहि तसेंच वाटतें; परंतु मी ह्मणतों, इतक्या थराला न जातां महाराणाजींनीं हा आरोप परत घ्यावा, यांत विशेष शोभा आहे.

**संग्रामसिंह**—मेघसिंहजी! मला वायफळ बोलण्याचा तिटकारा आहे! एक वेळ तोंडांतून काढलेले शब्द मी कधींहि परत घेणार नाहीं! मी आणखी एकदा स्पष्ट सांगतों, कीं, हा तुवर चोर आहे! रात्रीचा समय पाहून यानें आमचें निशाण बजरंग टेंकडीवरून चोरून नेलें. आतां खुद्द आमच्याशीं लढण्याची याची हिंमत नाहीं व तो प्रसंग टाळण्यासाठीं तुह्मीहि सर्व त्याची तरफदारी करित आहां हें मी जाणतों! चिंता नाहीं, मी आपल्या बाजूनें एक योद्धा तयार करीन. मात्र मेघसिंहजी आपण ह्याबद्दलची इतर सर्व तयारी करा.

**मेघसिंह**—ठीक आहे. ज्या अर्थी मध्यस्ती पतकरली, त्या अर्थी अखेरपर्यंत नेट दिलाच पाहिजे. चला तर आतां.

[ तुवर, जैतसिंग व गजसिंह खेरीज करून सर्व जातात.

**जैतसिंग**—( तुवरास ) अहो बहाद्दर ! आज तुमचे दोन अपमृत्यु टळले ह्मणायचे !

**तुवर**—ते कसे काय ?

**जैतसिंग**—एक त्या संग्रामसिंहाच्या जबड्यांतून कसेबसे सुटलांत व दुसरें, खुद्द संग्रामसिंहाशींच लढण्याचें ठरतें तर मृत्यु कांहीं फारसा दूर नव्हता !

**तुवर**—अंः, असल्या गोष्टींनां मी नाहीं जुमानीत ! बाकी, संगाशी प्रसंग पडला नाहीं, हें बरें झालें. (गजसिंहास) कां महाराज! आपली तर चैन आहेना ?

**गजसिंह**—ही मोहीम व या भानगडी यांनीं माझें मन अगदीं विटलें आहे. एकदम स्वदेशाचा रस्ता धरावा, असें वाटत आहे.

**विदूषक**—(बाजूस) असें वाटणें शहाणपणा आहे; परंतु ह्या लुच्चांच्या देखत तो बेत बोलून दाखविणें हा मात्र मूर्खपणा आहे !

**तुवर**—वाः, ह्या भानगडी आह्मीं स्वतःसाठींच केल्या असतील, नाहीं ? असा धोका देणें आपणाला शोभतें ? या भानगडींत जर कोणाचा फायदा झाला असेल, तर तो फक्त आपलाच !

**गप्पीदास**—रंग है ! रंग है !

**गजसिंह**—माझा फायदा जर झाला असेल तर तुमचाहि होणार असेलच ! ह्या गोष्टी ह्या वेळीं काढावयाच्या नव्हत; तरी पण मी तुह्मांला सांगतों, कीं, भिण्याचें मुळींच कारण नाहीं. माझ्या मतें तर तुह्मीं खुद संग राण्याशींच लढायचें होतें. त्याच्या बळाचा तुह्माला नुसता भ्रम आहे. काय करूं, तशीच वेळ असती तर मींच त्याची खात्री केली असती !

**विदूषक**—( बाजूस ) मूर्खपणा वाढत्या प्रमाणावर आहे !

**जैतसिंग**—हें पहा तुवरराज! द्वंद्वाच्या वेळीं मी तुमच्या साहाय्याला उभा राहीन.

**गप्पीदास**—( बाजूस ) लाडूच मटकायचे असतील !

**तुवर**—ह्याचा परिणाम कसा होईल, याबद्दल मला विशेष काळजी नाहीं. मी एवढाच विचार करित आहें, कीं, संगाकडून कोण योद्धा येण्यासारखा आहे.

**गजसिंह**—एव्हांच कशाला त्याचा विचार? जेवल्याखाल्यावर मग पाहतां येईल. चला, आमच्या डेऱ्यावरच चला.

**विदूषक**—जेवल्याखाल्यावर तसेंच ‘ प्याल्यावर ’ हें कसे विसरले ?

**जैतसिंग**—चला, तुह्मांला थोडें अमृत पाजलें पाहिजे, ह्मणजे हुषारी येईल.

**गप्पीदास**—(बाजूस) यांत शहाणपणाचा भाग विशेष आहे! पण पितांपितां जर कां बेताल झाले, तर मूर्खपणा मूर्तिमंत उभा राहील.

**गजसिंह**—अहो, असा धीर कां सोडतां? प्रसंग पडला तर स्वतः मी तुमच्या वतीनें संग्रामसिंहाशीं लढेन !

**गप्पीदास**—( बाजूस ) बस्स ! आतां मात्र मूर्खपणाचा कळस झाला !

[ जातात.

## प्रवेश तिसरा.

[ **स्थळ**–संग्रामसिंहाच्या शिबिरांतील एक रस्ता. ]

**करणसिंग**—(कुत्र्यासह प्रवेश करून) राण्यानें मला ओळखलें खास! इतकेंच नाहीं, तर माझ्या वर्तनाबद्दल त्याच्या हृदयांत पूर्ण उजेड पडला आहे व माझी मलिन कीर्ति पूर्ववत् सतेज व्हावी, अशी त्याची उत्कट इच्छा दिसते. हल्लींच्या स्थितींत मी त्याच्या नोकरींत राहिल्यापासून सर्व गोष्टी अशा सुयंत्र घडत आहेत, कीं, माझ्या चरित्राचा शेवट आनंदपर्यवसायी होईल, अशीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत ! कोणालाहि काय, दुःखाचा काळ यावयाचा असला ह्मणजे संकटें कशीं एकावर एक येऊन गर्दी करून सोडतात. तद्वतच, सुखाचे दिवस यावयाचे असल्यास आशेचे अंकुर भराभर जोमांत येऊं लागतात. मला नोकरीला राहून थोडा वेळ झाला नाहीं, तोंच महाराणाजींचा प्राण धोक्यांत पडून तो बचावण्याचें श्रेय मला मिळालें. निशाणाचा चोरहि चटकन् सांपडला. इतकेंच नाहीं, तर त्या तुवराशीं त्यांच्यातर्फें मींच युद्ध करावें, असें खुःद्द महाराणाजींनींच मला सुचविलें. ज्या प्रियतमेचा नामोच्चार करण्याची परवानगी ह्या महाराण्यानें मला दिली नाहीं, तोंच आज–ह्या बाबरशहाचा खलिता खुद्द तिच्या हातीं देण्याची मला परवानगी देतो ! तेव्हां, हा सर्व नशिबाचा खेळ आहे, यांत शंका नाहीं. (कुत्र्याच्या पाठीवर हात फिरवून) शेऱ्या ! तूं खूब बहाद्दरी केलीस ! तुला सोसाव्या लागलेल्या जखमांच्या भारंभार सूड उगवतों, समजलास? चला, आतां प्रियतमेचें दर्शन घेऊन पुढील तजविजीला लागूं. त्या परम पवित्र व तेजस्वी कुमारिकेपुढें ह्या माझ्या कृष्ण वर्णाचें, कृष्ण वस्त्रांचें, व कृष्ण कीर्तीचें काय तेज पडेल तें पडो ! आपण आतां आपलें मुक्याचें व्रत अंगिकारिलें पाहिजे.

[ जातात.

## प्रवेश चवथा.

[ **स्थळ**—कमलावतीचा तंबू. कमलावती पलंगावर पडली आहे, जवळ दासी उभी आहे, असा प्रवेश. ]

**जवाहीर**—ताईसाहेब, तो मुका शिद्दी बाहेर आला आहे. त्याच्या हातांत एक लखोटा आहे.

**कमलावती**—जा, त्याला इकडे पाठवून दे. ( जवाहीर शिद्यास आणिते. कमलावती व करणसिंग एकमेकांकडे पहातात. करणसिंग मुजरा करितो. कमलावती सुस्कारा टाकून स्वगत) आपणच का हे! प्रतापगडचे बहादूर सरदार करणसिंग तेच का आपण ? काय दशा ही! शेवटीं हें नीच दास्य नशिबीं आलं ना ? देवा, किती कष्ट हे !

**करणसिंग**—( दीर्घ श्वास सोडून अधोमुख उभा राहून स्वगत ) मना! थोडा धीर धर. अशा समयीं वाचाशक्ति आवरून धरणें मोठें प्रयासाचें आहे, परंतु इलाज नाहीं! आणलेल्या सोंगाची बतावणी करणें भाग आहे.

**कमलावती**—एकून माझा तर्क खराच तर ! त्या दिवशीं सर्व फौजेची सलामी झाली त्या वेळीं प्रथमच मीं आपल्या व आपल्या कुत्र्याला पाहिलं, व ताबडतोब ओळखलं. आपण कितीहि बेमालुम वेषांतर केलं, तरी मीं ओळखल्याशिवाय राहीन का ? तर मग, आतां हें मौन कशाला ? मन मोकळं करून बोलाना ? आपणाला भीति का वाटते माझ्याशीं बोलायला? पण भीतीनं आजपर्यंत आपणाला स्पर्श केल्याचं मला स्मरत नाहीं ! ( थांबून ) मग काय लज्जेमुळं का आपणाला बोलवत नाहीं ? छे, छे, आपण कशाला लाज वाटून घेतां ? ज्यांनीं आपणाशीं अन्यायाचं वर्तन केलं, त्यांनां लाज ! तुमचा तिचा काय संबंध ?

**करणसिंग**—( सुस्कारा टाकून तोंडावर बोट ठेवितो. )

**कमलावती**—(साश्चर्य) काय—अझूनहि मौनच ! बरोबर, ह्या वेषाशीं कृतीचा मेळ आहे. मला नव्हतं असं वाटलं! का मी हें सर्व उघड उघड बोलल्यें म्हणून आपणाला राग आला ? आपली ही कष्टप्रद स्थिति पाहून माझ्या हृदयांत जी कालवाकालव होत आहे, तिच्या योगानं आपणाशीं बोलतांना मी अमळ मर्यादेबाहेर गेल्यें, याबद्दल का आपण माझ्याशीं मौन धरलं ?

**करणसिंग**—( हात चोळतो, सुस्कारे टाकतो व मानेनें नाहीं नाहीं असें सुचवितो. )

**कमलावती**—हा काय बाई चमत्कार! असं काय करतां–हात कां जोडतां–झालं तरी काय आपणाला? मीं काय बरं समजावं? त्यांच्या दुष्टाव्यामुळं तुह्मी वाचाशक्तीला खरोखरच का अंतरलांत? त्या मेल्या यवनांनीं आपणांवर कांहीं करणी तर नाहींना हो केली? (थांबून) नाहीं, मला नाहीं तसं वाटत! हा आपला कांहीं तरी हट्ट दिसतो. ठीक आहे, मी नाहीं आपणाला यासंबंधांत आतां प्रश्न करणार बरं! जसं व्हायचं असेल तसं होईल (ताठ्यानें) मुक्याचं व्रत मलाहि घेतां येतं! काय काम आहे आपलं?

**करणसिंग**—(पत्र देतो व माझा नाइलाज आहे असें सुचवितो.)

**कमलावती**—याबरोबर तोंडी निरोप कांहींसुद्धां नाहीं ना? बरं आहे! इतकी बडबड केली, आर्जवं केलीं, पण ह्यांच्या तोंडून एक शब्दसुद्धां निघत नाहीं! मीच वेडी! मीच तुमच्या क्लेशाला कारण झाल्यें. तेव्हां आपण करतां हें रास्तच आहे! पण तुमच्यासाठीं मला किती दुःख होत आहे, हेंहि ईश्वर जाणतो आहे. जा, दूर तिकडे उभे रहा. जसा वेष तसं आचरण! माझी इतकी विनवणी ऐकून खरोखरीच्या मुक्याला दिखील वाचा फुटली असती. चला, झालंना तुमचं काम? मग आतां कां घोटाळतां?

**करणसिंग**—(पत्राकडे पाहतो)

**कमलावती**—खरंच, खरंच, विसरल्यें—आज्ञांकित दास उत्तराची अपेक्षा करतो–कोणाकडून आणलं हें पत्र? बाबरशहाकडून—आणि दादासाहेबांच्या संमतीनंच हें मजकडे आलं! चमत्कार आहे. काय ह्मणतो बादशहा (वाचते) "आपण माझा पुत्र शहाजादा हुमायून ह्याशीं निका लावण्याचें कबूल करावें अशी माझी विनंति आहे–" (संतापून) मेल्या! आग लाव तुझ्या त्या विनंतीला! शर्थ झाली! सिसोदिया वंशांतली बेटी आणि तिचा यवनाशीं विवाह–आमच्या दादासाहेबांचा मानीपणा त्यांनां सोडून गेला वाटतं? (चवताळून) आणि हा निरोप मजकडे आणण्याचं काम आपण पत्करिलं? फार उत्तम कामगिरी बजावलीत! जा, त्या आपल्या शहाकडे, अन् जर कधीं तुह्माला वाचा फुटली तर त्याच्या पत्राची मीं काय वाट लावली हें सांगा त्याला! जा, निघा इथून! (पत्र पायांखालीं तुडविते. करणसिंग जातो. संग्रामसिंह दुसऱ्या बाजूनें प्रवेश करितो.)

**संग्रामसिंह**—कां ताईसाहेब! जेव्हां पहावें तेव्हां तुह्मी आपल्या अगदीं रागानें फुणफुणलेल्या असतां! शहाच्या पत्राचा परिणाम वाटतें हा! उत्तर लिहिलेंत का?

**कमलावती**—घ्या तें पत्र आणि पाठवा आपणच उत्तर!

**संग्रामसिंह**—ताई, वेळ मोठी कठीण आहे. ह्या दररोज नवीन उत्पन्न होणाऱ्या भानगडी, मोहिमेबद्दल निराशा व सर्वत्र माजलेला फितूर ह्या सर्वांचा विचार करून शहाला उत्तर पाठविलें पाहिजे.

**कमलावती**—दादासाहेब! आपल्या तोंडून आणि हे उद्गार! बोलल्यें याची माफी असावी, सिसोदिया वंशांतल्या महान् पराक्रमी राण्याला ह्या पत्राचा जबाब देण्याला विचार करण्याची जरूर पडावी, हें लज्जास्पद नव्हे काय ? आपली बेटी यवनाच्या गोटांत लोटूनच जर देशकार्य साधायचं होतं, तर त्याला ह्या प्रचंड मोहिमेच्या पोकळ खटाटोपाची काय जरूर होती ?

**संग्रामसिंह**—ताई, तुझें डोकें अद्याप ठिकाणावर आलेलें नाहीं. अन्य समय असता तर ह्या तुझ्या भाषणाला योग्य जबाब मींहि दिला असता; परंतु तुझी समजूत घालण्यासाठींच मी आलों आहें. बोल, तुला वाटेल तें बोल. माझें बोलणें पुरतें ऐकूनसुद्धां घेण्यापुरता तुला दम नाहीं, याला माझा नाइलाज आहे. माझे विचार मी आतां बाजूला ठेवतों, आणि अगदीं तूं सांगशील तो जबाब शहाला पाठवितों. जबाब तर पाठविलाच पाहिजे.

**कमलावती**—ल्याहा त्याला, कीं, तुझ्यासारख्या बादशहापेक्षां एखाद्या कंगाल रजपूताची बायको होण्यांत मला जास्त भूषण वाटेल !

**संग्रामसिंह**—ठीक आहे, अगदीं अस्सें लिहितों. पण अशा कोणच्या कंगाल रजपुतावर तूं अनुग्रह करणार, तेंहि सांगून टाकलेंस तर बरें नाहीं का होणार ?

**कमलावती**—बस करा आपली थट्टा ! जखम करून तिला डवचणं हें शूराचं काम नव्हे !

**संग्रामसिंह**—बरें, कर्तव्याला चुकणें हें तरी शूराचें काम आहे का ? सगळाच दोष तूं मजवर लोटूं नकोस ! अपराधाच्या मानानें शिक्षा करण्यांत आमचा कडकपणा दिसला असेल, तर पराक्रमाच्या मानानें कृपा करण्यांतहि आह्मी कसूर करणारे नाहीं !

**कमलावती**—ती फुशारकी राहूं द्या ! आपला न्याय ह्मणजे निर्दयपणा व कृपा ह्मणजे केवळ लहर, ही गोष्ट जगाला कळून चुकली आहे !

**संग्रामसिंह**—अग, सगळेंच एकदम बोलूं नकोस ! उद्यांच्या द्वंद्वाचा काय निकाल होतो तो पहा तर खरें. खरेंच ताई, उद्यां ह्या द्वंद्वाला तूंहि आलेंच पाहिजे.

द्वंद्वाची जागा व इतर सर्व व्यवस्था खुद्द बाबरशहानें आपल्या अंगावर घेतली आहे व कांहीं कारणांमुळें मलाहि ती पसंत पडली आहे.

**कमलावती**—मी नाहीं येणार तें पहायला !

**संग्रामसिंह**—हें पहा, काय होईल तें होवो, तूं येच उद्यां. तुझ्या मनांत माझ्याबद्दल जी अढी आहे, ती कदाचित् ह्या द्वंद्वानंतर नाहींशी होईल, अशी मला फार उमेद आहे.

**कमलावती**—मी अशी हुरळून जाणार नाहीं ह्मटलं !

**संग्रामसिंह**—त्याचा विचार द्वंद्वानंतर पाहूं ! येतों मी आतां. उद्यां सकाळींच स्वारी निघेल, करितां तयारीला लाग.

( दोघें परस्परांकडे पाहून गालांत हंसतात. )

**संग्रामसिंह**—( पुढें येऊन ) हा सर्व बखेडा आनंदपर्यवसायी होणार, अशीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं आहेत. उद्यांच्या द्वंद्वांत करणसिंग खास विजयी होणार, अशी माझी मनोदेवता मला सांगूं लागली आहे ! आणि एकदा का तसें झालें, कीं, ह्या गजसिंग वगैरेंची पुन्हा नाक वर करण्याची कधीं छाती होणार नाहीं ! ह्या द्वंद्वासंबंधीं सर्व आधिकार मीं आपखुषीनें माझ्या कट्ट्या शत्रूच्या हातीं दिले, ही गोष्ट माझ्या सैनिकांपैकीं बऱ्याच लोकांनां पसंत नाहीं, असा बोभाटा कानीं आला आहे. त्यांची ठाम समजूत, कीं, जेवढा ह्मणून मुसलमान तेवढा सारा बेमान ! औदार्य व थोरपणा काय तो एकट्या आह्मां रजपुतामध्येंच वास्तव्य करितो ! केवढी चुकी ही ! निदान ह्या बाबरशहाच्यासंबंधानें तरी असें विधान करणें ह्मणजे महत्पाप होय, असें मी समजतों. वस्तुतः मी त्याचा कट्टा दुस्मान व माझा मृत्यु त्याच्या फायद्यावर, अशी स्थिती असतांहि एखाद्या जिवलग आप्ता-प्रमाणें त्यानें आजारीपणांत माझा समाचार घेतला, व आपल्या दरबारचा प्रत्यक्ष धन्वंतरी असा वैद्य पाठवून मला एक तऱ्हेनें जिवदानच दिलें ! ही त्याची कृति असाधारण औदार्याची नव्हे काय ? जगाच्या इतिहासांत अशीं उदाहरणें किती सांपडतील ? तें कांहीं नाहीं ! मीं ठरविलें तेंच योग्य ! उद्यांच्या प्रसंगीं आदिस्थानाचा मान मी त्यालाच देणार व बादशहा जो निकाल करील तोच कबूल करणार. उद्यांचा द्वंद्वप्रसंग माझ्या खाजगी हिताहिताचा आहे आणि त्यांत मीं शहाला माझ्या वडील भावाचा मान दिला, तर त्यांत इतरांनां विषाद वाटण्याचें कारण नाहीं. समरांगणावर जरी मी त्याचा वैरी असलों तरी त्यासाठीं शिष्टाचार व कृतज्ञता हे माणूसकीचे मुख्य धर्म सोडले पाहिजेत, असें कोणालाहि ह्मणतां येणार नाहीं. यांतून आह्मी तर रजपूत ! आह्मी दिवसभर आपल्या शत्रूशीं घोर संग्राम करूं,

पण विश्रांतीच्या वेळीं दोघेहि एकाच ताटांत बसून भोजन करूं, एकाच अंथरुणावर नि:शंकपणें निजूं व दुसऱ्या दिवशीं पुन्हा एकमेकांचा प्राण घेण्यासाठीं उद्युक्त होऊन लढाईला सुरुवात करूं! खरा मोठेपणा पुष्कळ लढाया मारण्यांत नाहीं, तर आपल्या शत्रूला खऱ्या मित्राप्रमाणें वागविण्यांतच आहे, हें प्रत्येक शूरानें लक्ष्यांत वागविलें पाहिजे.

[ जातो.

## प्रवेश पांचवा.

[ **स्थळ**—द्वंद्व युद्धासाठीं तयार केलेली जागा. बाबरशहा अग्रस्थानीं बसला आहे, रजपूत राणे व इतर सरदार दोन्हीं अंगांस बसले आहेत, राणीवंशांतील स्त्रिया पडद्यांत बसल्या आहेत असा प्रवेश. ]

**बाबर**–ज्या सर्व शक्तिमान् परमेश्वरानें ही पंचमहाभूतात्मक सृष्टि निर्माण केली त्या परमात्म्याच्या लीलेचें पूर्ण ज्ञान आह्मां हीनबुद्धि मानवांस न झाल्यामुळें पदार्थमात्राच्या बाह्य स्वरूपावर भुलून आपण भलत्याच मार्गाचा अवलंब करून अंतीं पस्तावतों. इहलोकचे आपण क्षुद्र मानव, आपसांतील ज्ञातिभेद, धर्मभेद, व इतर सर्व भेद विरूसन एकचित्त झालों, तर त्या संघशक्तीनें खुद्द स्वर्गावरहि आपण चाल करून जाऊं असें मला वाटतें; आणि असा प्रसंग येऊं नये ह्मणूनच महत्त्वाकांक्षा ही एक कलहप्रिय अप्सरा मनुष्यमात्रास त्या उच्च कल्पनेपासून पराङ्मुख करून देण्याकरितां देवानें सृष्टींत पाठविली असावी; परंतु आनंदाची गोष्ट आहे, कीं, तिची नजर चुकवून आज या घटकेला आपण एकमेकांचे कट्टे शत्रु असूनहि मित्रभावानें कांहीं एका प्रसंगासाठीं एकत्र जमलों आहों. यासाठीं ही घटका जगाच्या इतिहासांत अपूर्व समजली पाहिजे, व याबद्दल मी आपणां सर्वांचा आभारी आहें. आतां आपल्या नियमित कार्याला सुरुवात व्हावी, असें आह्मीं सुचवितों.

**संग्रामसिंह**—यवनाधीश! आपल्यासारखा थोर मनाचा शत्रु मला दिल्याबद्दल मी त्या जगच्चालकाचा अत्यंत आभारी आहें! राज्यतृष्णेनें जरी कोणालाच सोडलें नाहीं हें खरें आहे, तथापि ती तृष्णा भागवितांना स्थलाचा, पात्राचा व पेयाचा विचार करणारे क्वचित आढळतात व अशांचीच स्मृति जगाच्या इतिहासांत

कायम राहते. आजचा कार्यभाग आटोपल्यावर उद्यां आपण आपल्या कर्तव्यानुरूप एकमेकांसमोर दंड थोपटून उभे राहूं हें जरी खास आहे, तरी या घटकेचा मलाहि फार आनंद वाटत आहे. इतकेंच नाहीं, तर ही घटका हिंदुमुसलमानांच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिली पाहिजे ! असो. आपल्या आज्ञेप्रमाणें आतां कार्यक्रम सुरू व्हावा असें आह्मी इच्छितों. दोन्हीकडचे योद्धे तयार आहेतच.

**गजसिंह**—( उठून ) आमच्याकडील राजा सिलौदी तुवर तयार आहेत !

( तुवर उभा राहतो. )

**गप्पीदास**—( हळूच ) आमच्या महाराजांनींहि पोटाला तंग देऊन ठेविला आहे !

**संग्रामसिंह**—आमचा योद्धाहि तयार आहे !

**तुवर**—( स्वगत ) तो कोठें दिसत तर नाहीं ! कोण बरें असावा ?

( एक शिंगाड्या येतो. )

**पहिला शिंगाड्या**—( शिंग वाजवून ) राजाधिराज महाराज संग्रामसिंह की जय ! सर्वांस कळावें, कीं, आज या रणभूमीवर महाराणा संग्रामसिंहांच्या बाजूनें सरदार करणसिंग हे राजा सिलौदी तुवर यांच्याबरोबर युद्ध करतील. राजा तुवर यांनीं महाराणा संग्रामसिंह यांचें भव्य निशाण कांहीं दिवसांपूर्वी बजरंग टेंकडीवरुन चोरून नेलें व तद्वारा त्यांचा अपमान केला. हा तुवर राजांवर आरोप आहे व त्याची शाबिती आजच्या द्वंद्वयुद्धावर अवलंबून राहील.

[ जातो.

**दुसरा शिंगाड्या**—( पुढें येऊन शिंग वाजवून ) सर्वत्रांस कळावें, कीं, आतां ज्या आरोपाबद्दल मजकूर आपण ऐकिला, तो सर्वथैव खोटा आहे व तो खोटेपणा राजा तुवर हे राणा संग्रामसिंहाच्या योद्धयाशीं युद्ध करून सिद्ध करून दाखवितील.

[ जातो.

(हें भाषण होत असतां तुवर व जैतसिंग आपसांत बोलतात.)

**तुवर**—हा करणसिंग आतांच कसा एकदम उपस्थित झाला ? जसा राणा तसाच हा ! याशीं प्रसंग चांगला नाहीं.

**जैतसिंग**—असे घाबरतां कां ? करणसिंग कांहीं तुह्माला भारी नाहीं !

**तुवर**—करणसिंग नाहीं भारी, पण माझें मनच मला भारी झालें आहे !

**संग्रामसिंह**—करणसिंग, चला.

**करणसिंग**—( पुढें येऊन ) हे रणदेवी ! ज्या पक्षासाठीं आज मी येथें द्वंद्व करणार, तो खरा आहे अशी माझी खात्री आहे. यासाठीं तूं मला सहाय हो ! द्वंद्वांत मी धर्मबाह्य वर्तन करणार नाहीं ! ( मुजरा करून परततो. )

**तुवर**—(पुढें येऊन) मीहि असें प्रतिज्ञापूर्वक सांगतों, कीं, माझा पक्ष खरा आहे व मजवरचा आरोप खोटा आहे.

( पागडीचा तुरा पडतो. प्रेक्षक कुजबुजतात. )

**बाबर**—वीरहो ! सत्याचा फलदाता खुदा आहे. ज्याची बाजू खरी असेल तो निःसंशय जय पावेल ! यासाठीं आतां द्वंद्वाला सुरुवात व्हावी, असें आह्मी फरमावतों.

**करणसिंग**—( द्वंद्वयुद्ध सुरू होतें. करणसिंग वारामागून वार करतो व ते करतांना पुढील प्रमाणें एकेक वाक्य ह्मणतो. ) हा-कलागती लावण्याबद्दल ! हा राजद्रोहाबद्दल ! हा-विश्वासघाताबद्दल ! हें-शत्रूला आंतून सहाय होण्याचें इनाम ! हा-चोरीबद्दल ! हा-शेऱ्याच्या जखमेबद्दल ! हें-खून करण्याच्या प्रयत्नाचें बक्षीस ! आणि हें-रणभूमीवर खोटी प्रतिज्ञा केल्याचें फळ ! (तुवर घायाळ होऊन पडतो. करणसिंग त्याच्या छातीवर बसतो. ) बोल ! झाली भरपाई, कां राहिली आहे कांहीं बाकी ?

**बाबर व संग्रामसिंह**-(पुढें येऊन त्यांनां सोडवितात.) शाबास ! शाबास ! ! शाबास ! ! !

**बाबर**—उठा, युवराज भीमसिंह ! सोडा त्या नीचाला.

**संग्रामसिंह**—सर्व ( एक स्वरानें ) भीमसिंह ! भीमसिंह कोण ?

**बाबर**—ऐका ! तुह्मांला आश्चर्य वाटणें साहजिक आहे ! कारण, आजपर्यंत हा उदार व थोर विचाराचा राजपुरुष निरनिराळ्या रूपानें विदित आहे. तरी यापुढें तसें राहण्याची जरूर नाहीं ह्मणून आह्मी सर्वांस कळवितों, कीं, प्रतापगडच्या महाराणा सज्जनसिंहजींचा ज्येष्ठ पुत्र युवराज भीमसिंह तो हाच !

( संग्रामसिंह भीमसिंहाला आलिंगन देतो. )

**सर्व**—युवराज भीमसिंहकी जय !

**भीमसिंह**—शहानशहांनीं माझा जो गौरव केला, त्याला मी पात्र नाहीं ! याचें सर्व श्रेय शेरकोह अमीर यांच्याकडे आहे. या दरबारांत ते कां दिसत नाहींत. हें मला समजत नाहीं !

**संग्रामसिंह**—तसेंच, माझे प्राणरक्षक हकीमसाहेब येथें दिसत नाहींत!

**बाबर**—आहेत. ते दोघेहि पलीकडल्या दालनांत बसले आहेत. तुमची इच्छा असेल तर मीच जाऊन त्यांनां घेऊन येतों.

( जातो व हकिमाची दाढी लावून येतो. )

**बाबर**—बंदगी मालिक महाराणाजी! एका कवीनें ह्मटलें आहे " रोगग्रस्त मनुष्य आपल्या हकिमाला त्याच्या चाहुलीवरून देखील ओळखतो; परंतु तोच बरा झाला ह्मणजे तो हकीम अगदीं त्याच्यासमोर उभा असला तरीहि रोगी त्याला ओळखित नाहीं! ही जगाची रीतच आहे!

( सर्व आश्चर्यचकित होतात. )

**संग्रामसिंह**—मी शुद्धींत आहें, कीं, गैरशुद्धींत?

**भीमसिंह**—( स्वगत ) माझा शेरकोह अमीर हाचसें दिसतें!

**बाबर**—भीमसिंहजी, तुमच्या शेरकोहालाहि आणूं का? सांगत असाल तर आणतों!

**भीमसिंह**—शहानशहा! माफी असावी. ( शहा दाढी काढून टाकतो. ) अजाणतेपणामुळें मीं आपणाला जे कष्ट दिले, त्याबद्दल मला फार पश्चात्ताप होत आहे.

**संग्रामसिंह**—बादशहा! मी आपला कट्टा शत्रु असूनहि आपण माझें प्राणरक्षण केलें व त्यासाठीं हकीम बनलां, ही आपली कृति असाधारण आहे. अज्ञानामुळें माझ्या हातून ही आपली हेलना झाली, त्याबद्दल मी आपली क्षमा मागतों!

**बाबर**—( स्वगत ) आज वल्लभाचार्यांनीं ऐन वेळेवर येण्याचें कबूल केलें असून स्वारी अद्याप कां बरें आली नाहीं? (उघड) महाराणाजी! आपण हें कांहीं मनांत आणूं नये. चला, आपलें चालू काम अगोदर संपवूं. यासंबंधांत आपण सर्वांनीं आह्माला प्रमुखत्व दिलें आहे, तेव्हां ज्या गोष्टीचा परिणाम या द्वंद्वांत झाला तिचा निकाल लावला पाहिजे. राजा तुवर! असे पुढें या. बोला, तुमच्यावरचा आरोप पुराव्यानें शाबीत आहे कीं नाहीं?

**तुवर**—होय, मी सर्वस्वी अपराधी आहें. मात्र—

**बाबर**—सर्व अपराध तुमचा एकट्याचाच नाहीं, हें आह्माला माहीत आहे. तुह्मी आपल्या हिस्सेदारांचीं नांवें सांगाल काय? गजसिंह महाराजांनीं तुह्माला कितपत मदत दिली?

**गजसिंह**—( एकदम पुढें येऊन ) या चोरींत माझा बिलकुल संबंध नाहीं ! राजा तुवर यांनीं कबूल केल्याप्रमाणें ही निशाणाची चोरी निवळ त्यांनी एकट्यानींच केली, याबद्दल हे जैतासिंगहि वाटेल तर आपली खात्री करतील. पुढेंमागें कोणी असें ह्मणेल, ह्मणून मी त्या चोरीच्या वेळीं आपल्या डेऱ्यांत बसून राहिलों होतों ! या गोष्टीबद्दल वाटेल तितके साक्षीदार मी उभे करीन ! ( सर्व हंसतात. )

**गप्पीदास**—शहाणपणा पाघळला !

**बाबर**—आपणाबद्दल जो संशय होता, तो आतां पार नाहींसा झाला आहे. कारण, आपल्या अंगीं इतका दूरदर्शीपणा असेल, हें तेव्हां आह्मांला माहीत नव्हतें. बरें जैतसिंग ! तुमचा या निशाणाच्या चोरींत कांहीं संबंध आहे का ?

**जैतसिंग**—मला यांतील कांहींएक माहीत नाहीं !

**बाबर**—आहे, तुमच्यांत बरेंच पाणी आहे ! बरें, कां हो, महाराणा संग्रामसिंहाचा खून करण्यासाठीं कोणा इसमाला तुह्मीं व तुवर यांनीं पांचशें मोहरा देण्याचें कबूल केलें होतें का ?

**जैतसिंग**—असला नीच आरोप आपण मजवर केवळ संशयबुद्धीनें आणित आहां. राणाजींवर कोणीं दुष्टानें कटयार उचलली होती, व अखेर तो इसम स्वतःच मारला गेला, हें मीं ऐकिलें आहे. तुवर, गजसिंहजी व मी हे परस्परांचे स्नेही आहोंत. आमच्यापैकीं एकाच्या हातून एक यःकश्चित् गुन्हा घडला यावरून सर्वच गुन्हे आह्मीं केले असें आपण ह्मणाल, तर हा जुलूम होईल ! तो मारेकरी मेल्यामुळें आपणांला हा नीच आरोप आमच्याच अंगीं चिकटवण्याला मोठें सोयीचें झाल्यासारखें दिसतें.

**बाबर**—(एकास) जा, त्या तंबूंत जो इसम बसलेला आहे, त्याला इकडे आणा.

( गजसिंह वगैरेंची तोंडें फिक्कीं पडतात. )

**जैतसिंग**—( स्वगत ) अरे ! हा जिवंत कसा ? आतां बेतली खरी !

**बाबर**—कां ! डोळे कां फिरवितां ? त्याच्या तोंडून ऐकण्याची इच्छा आहे ? तुह्माला वाटलें, कीं, तो मेला, आतां काय मुद्दा आहे ?

**जैतसिंग**—मी अपराधी आहें !

**बाबर**—बस्स ! आपणां सर्व रजपूत महाराण्यांनां आमची अशी सूचना आहे कीं, आजपासून या त्रिवर्गांनां नीच समजून यांच्याबरोबर कोणताहि व्यवहार तुह्मीं करूं नये ! तुह्मीं तिघांनीं इथून उठून जावें, यापुढें इथें बसण्याची तुमची योग्यता नाहीं !

( तुवर, जैतसिंग व गजसिंह तोंडें खालीं करून जातात. )

**संग्रामसिंह**—शहा ! ही न्यायाची घटका आहे. अपराध्याला आपण योग्य शासन केलें, आतां निरपराध्यास बक्षिस देण्याचें आनंददायक काम मला करूंद्या ! मात्र तसें करण्यापूर्वी या आमच्या बहादूर भीमसिंहजींची हकीगत आपणांस कशी कळली, हें ऐकण्याची फार उत्कंठा आहे.

( इतक्यांत ' राधाकृष्ण राधाकृष्ण ' असा घोष अधिकाअधिक जवळ जवळ ऐकूं येतो.)

**बाबर**—ती हकीगत सांगण्याचा अधिकार ज्यांनां आहे, ते हे पहा तुमचे साधु वल्लभाचार्यच इकडे येत आहेत !

**वल्लभाचार्य**—(प्रवेश करून) कां संग्रामसिंहजी ! या गोसावड्याच्या वचनाचा ठोकताळा आला का? ( सर्व पायां पडतात. )

**संग्रामसिंह**—महाराज ! मी पामर आहें. अविचारानें अंध होऊन आपला अनादर केला, याबद्दल अत्यंत पश्चात्ताप होत आहे. क्षमा करणार प्रभू समर्थ आहेत !

**वल्लभाचार्य**—राजा ! तूं मनाचा थोर आहेस, हें मी पूर्णपणें जाणतों. मात्र असा उतावीळपणा पुन्हा करूं नकोस. प्रतापगडच्या सज्जनसिंह महाराजांनीं या मोहिमेंत तुला मदत करण्याचें कबूल केलें असून ऐन वेळेवर त्यांनीं माघार घेतली, असा तुझा समज आहे; परंतु यांतील वास्तविक प्रकार असा होता, कीं, या त्यांच्या शूर व पराक्रमी राजबिंड्याला राजकीय थाटानें या धर्मयुद्धांत सामील होण्याचें न आवडून नांव बदलून तो एखाद्या सामान्य प्रतीच्या सरदाराच्या दर्जानें मोहिमेंत सामील झाला, ही गोष्ट प्रथमत: मलाच समजली. कारण, याच्यावर नजर ठेवण्याबद्दल सज्जनसिंह महाराजांकडून वारंवार पत्रें येत; परंतु हें काम मजकडून नीट होईना. कारण, मी राहणार गिरिकंदरांत व छावणींतिल सर्व प्रकार नेहमीं कानीं येणें शक्य नाहीं. म्हणून ही कामगिरी मीं या उदार व थोर अशा बाबर-शहावर सोंपविली. हा निरनिराळ्या वेषानें तुमच्या छावणींत फिरत असतो, हें मला ठाऊक होतें. खरोखर, या बाबरशहासारखा यवनांचा स्वामी असून माझ्या गोवर्धननाथाच्या मूर्तिसाठीं एवढें रण माजावें, हें या आर्यभूमीचें दुर्दैव समजलें पाहिजे! असो. संग्रामसिंह! तुला सांगावयाचें एवढेंच कीं, केवळ तुझ्या नांवलौकिका वर भरंवसा ठेवून आजपर्यंत देशाची गुप्तरूपानें सेवा करणाऱ्या या श्रेष्ठ कुलावतंसाचें तूं योग्य गौरव करणें अगदीं जरूर आहे !

**संग्रामसिंह**—महाराज! ईश्वराच्या घरीं मी महान् अपराधी ठरेन! असल्या विश्वासू मित्राला छळल्याचें पातक मी कोठें फेडूं? भीमसिंहजी! आपण मला क्षमा करावी व माझ्यासाठीं आपणाला जे कष्ट झाले त्याच्या अल्प मोबदल्यादाखल मी आज आपणांला जी देणगी देत आहें तिचा कृपाकरून स्वीकार करावा. ( कमलावतीकडे पाहून ) कमलावती! इकडे ये. या वेळीं तरी मजकडे आनंदानें पहा. (तिचा हात धरून) भीमसिंहजी! ही सूर्यवंशी राजकन्या माझी प्रिय भगिनी कमलावती, आपणाला अनुरूप वधू असून आपलें तिचें प्रेम अत्यंत आहे हें मी जाणतों. यास्तव हिचें पाणिग्रहण करून आजपासून हिला आपली धर्मपत्नी व सहचारिणी मानावी.

( वाद्यें वाजतात. )

**बाबर**—( पुढें येऊन ) हें युग्म व हा विधि मला फार आवडला! म्हणून, त्याच्या सन्मानार्थ आजपासून व्रजभूमिवरील सर्व ताबा मी सोडून देतों व तो मुलुख शिक्केमोर्तबासह महाराणा संग्रामसिंह यांच्या हवालीं करितों.

**संग्रामसिंह**—भीमसिंहजी! तुमच्या शेऱ्या कुत्र्यानेंहि आमच्यासाठीं मोठी मर्दुमकी गाजविली आहे, तेव्हां त्याच्या खाण्यापिण्यासाठीं आम्हीं आमच्या राज्यांतला एक भाग तुमच्या स्वाधीन करूं इच्छितों. शिवाय, ज्या बजरंग टेंकडीवर त्यानें पराक्रम गाजविला, तेथें त्याच्या नांवानें एक स्तंभ उभारण्यांत येईल!

**वल्लभाचार्य**—ह्या मोहिमेसंबंधाच्या नाटकांत मला आतां कांहीं एक करावयाचें राहिलें नाहीं! माझ्या गोवर्धननाथाचे कष्ट नाहींसे होऊन शेवट आनंदांत झाला, हें पाहून त्या श्रीकृष्ण परमात्म्याच्या लीलेचें कौतुक किती करावें असें होऊन चित्तवृत्ति तल्लीन होत आहे! आतां भरतवाक्यादाखल दोन शब्द सांगतों, ते ध्यानांत ठेवा:-

**ज्यांच्या अस्थी मिळुनि समरीं निर्मिती पर्वतातें,**
**ज्यांचें निर्मी रुधिर अधुना चंडशा सारसातें;**
**ज्यांच्या आलिंगिति असिलता संगरीं वैरभावें,**
**प्रेमें त्या आप्रलय पुढतीं हिंद्वविंधीं रहावें!**

**[ शेवटचा पडदा पडतो. ]**

---